ब्रह्मीभूत परमहंस परिव्राजकाचार्य

# श्रीप्रज्ञानानंद सरस्वती


लेखिका

**डॉ. श्रीमती कमल बाळकृष्ण वैद्य**

एम. ए., पीएच.डी.


प्रस्तावना

**डॉ. रामचंद्र चिंतामण ढेरे**


**श्री रामचरित मानस प्रेमी मंडळ, डोंबिवली**

लेखिका : डॉ. श्रीमती कमल बा. वैद्य M. A. Ph.D.

आवृत्ती : ३री

अंक मूल्य : रुपये ३५/- फक्त

प्रकाशक : श्रीरामचरितमानसप्रेमी मंडळ,
४, श्रीगणेश, अनंतराज सोसायटी,
जलाराम मंदिरजवळ, डोंबिवली (पूर्व) ४२१ २०१.
दूरध्वनी : [illegible] डोंबिवली

मुद्रक : ओमेगा ऑफसेट
२ व ३, एमरल्ड कॉर्नर,
मराठा कॉलनी, टिळकवाडी,
बेळगाव - ५९० ००६.
दूरभाषा - ४२४१२४

॥ श्री सद्‌गुरु प्रसन्न ॥

॥ राम ॥

# - प्रकाशकाचे निवेदन -

श्रीसद्‌गुरु प्रज्ञानानंद सरस्वती स्वामी महाराज यांच्या चरित्र ग्रंथाची ही तिसरी आवृत्ती आपल्या हाती देतांना आम्हांस अत्यंत समाधान वाटत आहे.

पहिली आवृत्ती अत्यंत त्रोटक स्वरूपांत 'संतकृपा' प्रकाशन तर्फे प्रसिद्ध झाली. नंतर १९९० मध्ये दुसरी आवृत्ती काढतांना त्यांत श्रींची शिकवण ४० पृष्ठांत समाविष्ट करून तिची भर घालण्यांत आली. आतां या आवृत्तींत श्रींच्या शिष्य मंडळींचे अनुभव व आठवणींची भर घालण्यांत आली आहे. खरे तर ही सर्व सामुग्री १९८० मध्येच संकलित करण्यांत आली होती. त्यावेळी हयात असणाऱ्या अनेक व्यक्ती आज परलोकवासी झाल्या आहेत.

ज्या व्यक्तींनी आठवणी व अनुभव धाडले होते, त्यांचे संकलन केले आहे. काही मंडळींनी काहीच धाडले नाही. त्यामुळे त्यांच्या आठवणी वा अनुभवांचा अंतर्भाव होऊं शकला नाही. या बद्दल दिलगिरी वाटते. सर्वांवरच त्या गुरुमाऊलीची अपार कृपा होती व आहे. ज्याचा उल्लेख नाही त्यांनी क्षमा करावी. पण उल्लेख नसला तरी त्यांना कृपेचे अनुभव निश्चितच येत असणार या विषयी शंका नाही.

वाचकांनी ही सेवा गोड मानून घ्यावी हीच नम्र विनंती आहे.

- **प्रकाशक**

काही मंडळींनी धाडलेल्या आठवणी व अनुभवांची हस्तलिखिते गहाळ वा नष्ट झाल्यानें त्यांचा अंतर्भाव होऊं शकला नाही. याबद्दल वाईट वाटते! क्षमस्व!

# अनुक्रम

# एक तपोमय जीवन

ब्रह्मीभूत परमपूज्य परमहंस परिव्राजकाचार्य श्री प्रज्ञानानंद सरस्वती (१८९३-१९६८) यांच्या तपोमय जीवनाचे, प्रबोधक ग्रंथसंपदेचे आणि अध्यात्मिक अधिकाराचे ओझरते दर्शन घडविणारे हे पुस्तक सर्वसाधारण संतप्रेमिकांप्रमाणेच परमार्थ-क्षेत्रातील साधकांनाही प्रेरक ठरणारे आहे.

या पुस्तकाच्या लेखिका श्रीमती कमलताई वैद्य या श्रीस्वामींच्या अनुग्रहाला पात्र झालेल्या भाग्यवंतांपैकी एक असून, त्यांनी दीर्घकाळपर्यंत जवळून श्रीस्वामींचे आंतरिक चरित्र अनुभवले आहे. त्यांच्या साक्षात् अनुभवाचा रंग या चरित्रावर चढलेला आहे.

श्रीप्रज्ञानानंद सरस्वती हे आधुनिक महाराष्ट्रातील संतांच्या मांदियाळीतील एक श्रेष्ठ तपस्वी होते. पूर्वाश्रमीचे श्री. दत्तात्रेय नारायण कर्वे हे वयाच्या पंचेचाळिशीपर्यंत प्रशिक्षित पदवीधर शिक्षक म्हणून उत्तर कोकणात १९३६ पर्यंत काम करीत राहिले. परमार्थपरायण वृत्ती, विचक्षण बुद्धी आणि नवशिक्षणाने लाभलेली अभ्यासाची शक्ती यामुळे, अध्यापनाचे कार्य करीत असताना त्यांनी पारमार्थिक वाङ्मयाचे विपुल वाचन-मनन केले होते. या पूर्वसिद्धतेला जोड मिळाली श्रीगंगादासबाबांच्या प्रेरक सहवासाची. श्रीगंगादासबाबा हे संत तुलसीदासांचे परम भक्त होते. १९३१ च्या सुमारास त्यांची पहिली भेट झाली आणि पुढे सात-आठ वर्षे त्यांचे सान्निध्य लाभले. श्रीगंगादासांच्या प्रेरणेमुळे स्वामींना तुलसीदासांच्या रामचरितमानसाने वेडे केले आणि पुढे ते त्या महाग्रंथाच्या पारायणात, चिंतनात, आस्वादनात आणि त्याचे मराठी अवतरण घडविण्याच्या कार्यात रंगून गेले.

वयाच्या पंचेचाळिशीच्या सुमारास स्वामींनी ऐहिक जीवनाचा पूर्ण त्याग केला आणि चार-पाच वर्षे खडतर तपश्चर्या करून पन्नासाव्या वर्षी अधिकृत संन्यासही स्वीकारला. त्याच वर्षी त्यांनी आळे (ता. खेड, जि. पुणे) येथील श्रीवासुदेवानंद सरस्वती (पोटे स्वामी) यांच्याकडून दंड ग्रहण केला. पूर्वाश्रमात परमार्थवाङ्मयाचा जो प्रगाढ व्यासंग केला होता, त्याची दृढ बैठक सिद्ध असतानाच संन्यासग्रहणानंतर स्वामींची कवित्वशक्ती जागृत झाली आणि त्यांनी विपुल ग्रंथरचना केली.

'संगीत समश्लोकी गीता' व 'श्रीगीताकीर्तनतरंगिणी' हे गीताविषयक ग्रंथ, 'अभिनव रामायण' आणि 'वेदान्तसार अभंग रामायण' हे रामायणविषयक ग्रंथ, 'ब्रह्मस्तुति' व 'वेदस्तुतिभास्कर' हे श्रीमद् भागवतातील तत्त्वविवेचक

अंगांवरील ग्रंथ, 'श्रीपरमामृत प्रकाश' आणि 'श्रीगुरुगीता प्रबोधिनी' हे अद्वैतवेदान्तनिष्ठ साधकांना मार्गदर्शक ठरणारे ग्रंथ, आणि या सर्वांवर कळस म्हणजे रामचरितमानसावरील प्रचंड हिंदी-मराठी ग्रंथ, ही त्यांची ग्रंथसंपदा पाहिली की आपली मती स्तिमित होते. रामचरित मानसाविषयीचे त्यांचे वाङ्मय कार्य पाहिले की, साक्षात् श्री तुलसीदासच विसाव्या शतकातील महाराष्ट्रात अवतीर्ण झाल्याची जाणीव जागी होते.

परंडा (जि. उस्मानाबाद) हे श्रीस्वामींचे अखेरचे लीलास्थळ. या ठिकाणी त्यांनी २३ मार्च १९६८ या दिवशी प्रायोपवेशनपूर्वक देहविसर्जन केले. त्यांचे पाऊण शतकांचे जीवन ज्ञानसाधनेने, तपाने, वैराग्याने आणि अखंड प्रबोधनकार्याने भरलेले होते. त्यांच्या अनुग्रहाचा आणि मार्गदर्शनाचा लाभ झालेल्या सत्त्वसंपन्न साधकांच्या गुरुनिष्ठेमुळे त्यांचे अप्रकाशित वाङ्मय क्रमाने प्रकाशित होत राहील, असा विश्वास वाटतो.

— डॉ. रामचंद्र चिंतामण ढेरे

# १. संतचरणरज लागता सहज

**संतचरणरज लागतां सहज । वासनेचें बीज जळोन जाय ।।१।।**
**मग रामनामीं उपजे आवडी । सुख घडोघडी वाढों लागे ।।२।।**
**कंठीं प्रेम दाटे नयनीं नीर लोटे । हृदयीं प्रगटे रामरूप ।।३।।**
**तुका म्हणे साधन सुलभ गोमटें । परि उपतिष्ठे पूर्वपुण्यें ।।४।।**

खरोखर अनंत जन्मांचे सुकृत फळाला आले आणि म्हणून श्री सद्गुरुंची कृपा लाभली, की ह्या दीन दुबळ्या जीवाची दुर्दशा पाहून व जवळ पुण्याचा काहीच साठा नाही, तेव्हा पुढे आणखी काय अवस्था या जीवाची होईल अशी करुणा येऊन, श्रीगुरूंनी अहेतुकी कृपा केली ते समजत नाही! कारण काहीही असो, कार्य घडले हे मात्र खरे! नाहीतर कुठे तुकाराम महाराजांचे हे स्वानुभवाचे उद्‌गार आणि कुठे माझ्यासारखी साधनहीन अशी अज्ञ स्त्री! पण तुकाराम महाराजांनी वरील अभंगात जो संतचरणरजाचा प्रताप वर्णन केला आहे त्याचा शब्दशः अनुभव घेण्याचे भाग्य मात्र मला श्रीगुरुकृपेने लाभले.

त्याचे असे झाले, १९५१ मार्च ३१ तारखेस श्रींचे इस्लामपूरला प्रथम आगमन झाले. आम्हा सर्वांचे ज्येष्ठ व श्रेष्ठ गुरुबंधू श्री. ना. भा. जोशी यांचेकडे ते राहात असत. माझे पती डॉ. बा. श्री. वैद्य व कुटुंबातील इतर मंडळी, त्यांचे घरी काही पारमार्थिक चर्चा चाले ती ऐकण्यास जात असू. श्रींचा संध्या व नित्यकर्म करण्यावर फार कटाक्ष होता. डॉक्टरांच्या वडिलांनी म्हणजे कै. डॉ. श्री. म. वैद्य यांनीही साधुसंतांचा देवयानपंथ व प्रणवोपासना हे ग्रंथ लिहिले होते व त्यांचीही संध्यादि नित्यकर्मावर उत्तम श्रद्धा होती. तसेच डॉक्टरांच्या लहानपणी अष्ट्याचे श्रीदत्तमहाराज हे इस्लामपूरला येत असत. ते नेहमी सोवळ्यात असत. तसेच श्री. स्वामीजी पण नेहमी सोवळ्यात असतात, कुणाला स्पर्श करू देत नाहीत वगैरे पाहिल्यावर एक

प्रकारचा आदर उत्पन्न झाला. त्यातच डॉक्टरांना स्वप्न पडून आपल्या वडिलांनी श्रींचे पाय धरलेले आहेत असे दिसले. तेव्हा वडिलांनी जणू आपल्याला हे मार्गदर्शनच केले असे मनात येऊन श्री स्वामींच्याबद्दल त्यांना अधिकच प्रेमादर उत्पन्न झाला. त्यांनी श्रींच्या सांगण्याप्रमाणे नित्य संध्या, ब्रम्हयज्ञ वगैरे करण्यास सुरुवात केली. त्यातच एके दिवशी श्री स्वामींनी आम्हा उभयतांना पहाटे ध्यानाच्या वेळी आसन वगैरे घेऊन बोलाविले. त्यावेळी श्रींच्या दीर्घ प्रणवोच्चाराने डॉक्टरांची व माझी कुंडलिनी जागृत होऊन देवयान पंथातले विविध अनुभव आले. अशा प्रकारे हा गुरुशिष्य संबंध प्रस्थापित झाला.

स्वामी ज्या ठिकाणी राहात होते ती जागा त्यांच्या लेखनाच्या दृष्टीने व त्यांच्या भेटीस येणाऱ्या मंडळींच्या सोयीच्या दृष्टीने योग्य नव्हती असे पाहून आम्ही त्यांना आमच्या घरी निवास करण्याची विनंती केली. ती त्यांनी मान्य केल्यावर, आमच्या बंगल्यातील माडीवरची एक स्वतंत्र खोली निवासासाठी दिली. स्वामींच्या मानसाच्या टीकेवरील बहुतेक सर्वच लिखाण तेथेच झाले.

आमच्या घरीच त्यांचा निवास असल्याने आम्हास संत संगतीचा दुर्लभ लाभ झाला व स्वामींनी सांगितलेली साधनाही उत्तम प्रकारे चालू झाली. आमच्या घराण्यात दत्त उपासना चालू होती, म्हणून डॉक्टरांना दत्त उपासना व मला राम उपासना स्वामींनी दिलेली होती.

डॉक्टरना नित्य जप व ध्यानाच्या वेळी प्रकाशरूप परमात्म्याचे बहारीचे अनुभव येत. झोपेतही त्याच प्रकारची स्वप्ने पडत. दीर्घ प्रणवोच्चार होई. प्रकाशरूप परमात्मा कधी शुभ्र असा स्थिर प्रकाशरूप तर कधी नील प्रकाशाच्या लहरींची वलये दुरून येऊन आपल्या भोवती स्थिर होत आहेत, एकावर एक अशी असंख्य वलये होता होता सर्व आकाश निळ्या प्रकाशाने भरून गेल्याचा अनुभव येई. कधी ध्यानाभ्यासाच्या वेळी त्यांच्या असंख्य विविध मुद्रा होत. दोन्ही हातांनी एकाच वेळी अगदी एकसारख्या, ज्यांची नावेही माहीत नाहीत अशा मुद्रा होत.

एके दिवशी सकाळी ७-७। वाजता डॉक्टर फिरावयास गेले असताना त्यांची वृत्ती एकाएकी दत्ताकार झाली व श्रीदत्त, आपल्या इतक्या उंचीचे, आपल्याबरोबर येत आहेत असे बराच वेळ दर्शन झाले व अष्टसात्विकभाव

जागृत झाले. यानंतर कधी कधी श्रीदत्तांच्याबरोबर श्रीपरमहंस, श्रीविवेकानंद, तर क्वचित हनुमान यांचे दर्शन होई.

स्वामींनी मला राममंत्र दिलेला होता. मी श्रीरामाशी बंधूचे नाते जोडले होते. रामायणावरील टीकेचे लेखन माडीवरच चाललेले असे. मध्येच स्वामी जिन्याशी येऊन मुद्दाम मला हाक मारीत व रामायणातील निरनिराळे भाव सांगत. मी दुपारच्या वेळी खालच्या खोलीत रामायण वाची. श्रवणास आमच्या आळीतील १०-१२ बायका येत. स्वामींच्या लिहून झालेल्या वह्या आम्ही वाचत असू. त्यावेळी अत्यंत प्रेम उत्पन्न होई. वाचन सुरू झाले की एकेका भगिनीला त्यातील एकेका पात्राचा भाव येई. जणू आमची रामलीलाच चाले. हनुमंत, जांबुवंत वगैरेंचा भाव आला की बुभुःकार अभावितपणे सुरू होई. दशरथाचा भाव आला की रामविरहाचे वगैरे दुःख होई. असे आमचे रामायण, भजन, जप वगैरे चाले. या काळात एक दोघींना काव्य स्फूर्ती झाली. अनेक सुंदर पदे सहज झाली. माझेकडूनही अनेक काव्ये भराभर होऊ लागली. स्वयंपाक करीत असताना सुद्धा एखादे पद वा कविता होई. खरोखर स्वामींच्या कृपेने काय काय घडत होते याचे आता स्मरण झाले की हृदय भरून येते.

एकदा स्वामी मला म्हणाले, 'कमा, तुला मांजरीचे पिल्लू होणे आवडेल की वानरीचे पिल्लू होणे आवडेल ?' मी म्हटले की, मांजरीचे. मांजरीच्या पिल्लावर, स्वतःवर अशी काहीच जबाबदारी नसते, पिल्लांची सारी जबाबदारी मांजरीवर! ती-आई-तोंडात नेईल तिकडे जावे! पण माकडिणीच्या पिल्लाला, स्वतःला आईला धरून ठेवावे लागते. आपली जबाबदारी आपण घ्यायला लागते. असे म्हटल्यावर स्वामी हसले व म्हणाले, 'आहेस, शहाणी आहेस.'

एकदा असे झाले की, तुलसीरामायण सतत वाचनात असल्याने त्यातीलच (उत्तरकांड दोहा १२० मधील चौपायी १८ व १९) विचार मनात घोळत होते.

**सब कर फल हरि भगति सुहाई । सो बिनु संत न काहूँ पाई। ।**
**अस बिचारि जोइ कर सत संगा । राम भगति तेहि सुलभ बिहंगा। ।**

या ओळींचा पार अंतःकरणाच्या गाभाऱ्यात प्रवेश झाला आणि काही सुचेना. मनाला वाटू लागले की, संतकृपेने क्वचित कुणाला अशी भक्ती

मिळते.' हे खरे असेल, तर घरी श्रीसद्‌गुरुसारख्या साक्षात् संतांचा निवास आहे तर अशी संधी आपण सोडता कामा नये. या संधीचा आपण फायदा घेतला नाही तर जन्मभर मागून पश्चात्ताप करीत बसावे लागेल. आपण श्रीगुरूंना विनंती तर करून पाहू ! फार काय 'मूर्ख आहेस!' असे म्हणतील. नुकसान तर काहीच होणार नाही. झाला तर लाभच लाभ. म्हणून एकदा धारिष्ट केले. रात्री भजन वगैरे झाल्यावर सर्व मंडळी घरोघर गेली. पूर्ण शांतता होती. स्वामीही अत्यंत प्रसन्न होते. तेव्हा हात जोडून दाराशी उभी राहिले. श्रींनी विचारले, 'हे काय अजून तू इथेच? काय हवे आहे?' मी म्हटले, 'महाराज, मला काही मागायचे आहे, विचारायचे आहे.' श्री म्हणाले, 'सांग ना काय ते!' आणि मग अशी काही बोबडी वळली आहे! आधीच रडू कोसळले. तोंडातून शब्दही फुटेना. 'अग का रडतेस? काय झाले?' म्हणून स्वामींनी विचारताच 'आपल्या कृपेने मला प्रेम भक्तीचा लाभ व्हावा' असे कसेबसे शब्द उच्चारले. हे श्रींनी ऐकल्यावर मनमोकळे हसले आणि म्हणाले, 'भाग्यवान आहेस! होईल बरे तुझी इच्छा पूर्ण! झाले ना आता मनासारखे? जा आता झोप जा.' असे म्हटल्यावर काय आनंद झाला म्हणून सांगू!

श्रींनी आशीर्वाद दिला आणि काय चमत्कार झाला कुणास ठाऊक! खरोखरच एकदम भक्ती मिळाली की! काही साधन नाही, जप नाही, भजन नाही, काहीच नाही. केवळ गुरुकृपा! भागवतात वर्णन केल्याप्रमाणे घटकेत एकदम प्रभूचे भक्तवात्सल्य आठवून हसू येऊ लागे. ते हसणे थांबवताच येत नसे. तर घटकेत 'रामा, अजून तुला माझी नाही का रे दया येत?' असे मनात येई आणि जे रडू कोसळे त्याने अंतःकरण पिळवटून निघे, अक्षरशः धुण्याचा पिळा पिळावा तशी स्थिती होई. कधी कधी 'गुरूमहाराज गुरु' किंवा 'रामकृष्ण हरी' असे भजन आपोआप सुरू होई आणि अंतःकरणात अशा सुखाचा अनुभव येई की ..... त्या सुखाचे वर्णन कसे करू? भक्तिप्रेम सुखाचे वर्णन करता येत नाही असे जे नामदेव व तुकाराम महाराज म्हणतात त्याची प्रचीती सद्‌गुरुकृपेने आली. केवळ 'भक्ती तुला दिली' असे म्हटल्यावर ती एखाद्याला मिळाली, यात श्री स्वामींचे केवढे सामर्थ्य आहे हे दिसून येते.

या भक्तिप्रेमाच्या प्राप्तीमुळे सांसारिक कर्तव्ये मला नीट पार पाडता येईनाशी झाली. मुले लहान होती, शिकत होती, घरात पाहुण्यांचा नेहमीच राबता असे. तेव्हा या सर्व गोष्टींचा विचार करून मी व माझ्या यजमानांनी हा भक्तिप्रेमाचा आवेग कमी करण्याची स्वामींना विनंती केली. त्यांच्या जवळ

देण्याचेही सामर्थ्य होते व कमी करण्याचे सामर्थ्यही होते. म्हणून ते हसले व म्हणाले, 'बर! तुझही म्हणण बरोबर आहे. रामाबद्दलच तुझ प्रेम कमी होणार नाही, पण त्याचा आवेग तुला सोसवत नाही तो कमी करून टाकू.' आणि त्याप्रमाणे नंतर सर्व आटोक्यात आले.

माझ्या यजमानांचीही या मार्गातील प्रगती उत्तमरीतीने होत होती. आणि त्यांची अशी खात्री व विश्वास होता की सद्गुरुकृपेने देहाचे सार्थक होणार! ते नेहमी दत्तप्रभूंवर सर्व भार घालीत असत. श्रीदत्तांशी त्यांनी बंधूचे नाते जोडले होते व त्याप्रमाणे ते रोज आत्मनिवेदन करीत असत. जसे 'देव होऊनी देवासी भजावे' तसे 'अहं दत्तात्रेयः' असा भाव येऊन दत्तांनीच दत्तांची पूजा केली असा अनुभव त्यांना आला.

एकदा श्रींनी उभयतांना असा आशीर्वाद दिला की 'हृदये पश्यच आत्मानम् स त्वमेव त्वमेव तत्।' अर्थातच हा आशीर्वाद फलद्रुप झाल्याशिवाय कसा राहील?

श्रींच्या कृपेने डॉ. वैद्य यांच्या शेवटच्या दुखण्यात, त्यांचे ऑपरेशन वगैरे झाले तेव्हा, त्यांना सतत दत्तदर्शन होऊन पूर्ण शुद्धीवर असता. श्रीदत्तनामोच्चारपूर्वक त्यांनी पार्थिव देहाचा त्याग केला व ते श्रीदत्तचरणी लीन झाले. (१५ जून १९६५)

माझे प्राणनाथ
कै. डॉ. बाळकृष्ण श्रीपाद वैद्य
यांच्या चरणी
सादर प्रणाम करून
आम्हा उभयतांच्या वतीने
श्री सद्गुरुचरणीं
हे वाक्पुष्प
सादर समर्पण केले आहे.

श्रीगुरुंच्या अनेक लेकरांपैकी एक
**–श्रीमती कमल बाळकृष्ण वैद्य**

# २. कुलवृत्तांत, बालपण आणि शिक्षण

**मनुष्याणां सहस्त्रेषु कश्चिद्यतति सिद्धये।**
**यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः।।** (भ. गी. ७.३)

श्री भगवंतांनीच म्हटले आहे की, सहस्त्रावधी मनुष्यांमध्ये एखादा (ज्ञानाच्या) सिद्धीसाठी प्रयत्न करतो. त्या यत्न करणाऱ्या सिद्ध पुरुषांमध्ये एखादाच मला खऱ्या प्रकारे जाणतो. हे वर्णन ज्या सिद्धपुरुषांना योग्य प्रकारे शोभून दिसावे अशा क्वचित् आढळणाऱ्या सिद्धपुरुषांमध्ये श्रींची गणना होत असल्याने, त्यांच्या थोरवीचे वर्णन कितीही केले तरी ते अपुरेच ठरेल.

थोरामोठ्यांचा आश्रय केला तर तो केंव्हाही लाभदायकच ठरतो. 'बडे गहे ते होत बड जिमि बामन कर दंड' या न्यायाने श्रींसारख्या सत्पुरुषांचे गुणवर्णन करून इतर लाभ तर होतीलच, पण आपलीही चित्तशुद्धी होईल. हा 'चित्तशुद्धी' रूपी प्रसाद या ग्रंथाच्या परिशीलनाने आपल्यालाही प्राप्त व्हावा अशी श्रीगुरूंच्या चरणी नम्र विनंती करून, त्यांच्या चरित्रवर्णनास प्रारंभ करीत आहे.

## पुण्यवंत कुल

श्रींचे पूर्वाश्रमीचे नाव श्री. दत्तात्रेय नारायण कर्वे. कर्वे घराण्याचे मूळस्थान मुक्काम गिम्हवणे, तालुका दापोली, जिल्हा रत्नागिरी. कर्वे हे गार्ग्य गोत्री कोकणस्थ ब्राह्मण. श्रीहरिहरेश्वर व श्री जोगेश्वरी ही त्यांची कुलदैवते.

श्रींच्या खापरपणजोबांचे नाव भास्कर होते. त्यांचे पणजोबा श्रीधर व आजोबा गोविंद. गोविंदराव हे ठाणे जिल्ह्यातील बेलापूर येथे राहण्यास आले. त्यांना तीन मुलगे, हरी, केशव आणि नारायण. यापैकी श्री. नारायणराव कर्वे हेच श्रींचे वडील.

श्री. नारायणराव हे प्राथमिक शिक्षक होते. शिक्षकाचा पेशाच जात्या सात्विक, त्यातही श्री. नारायणराव हे स्वतः धार्मिक वृत्तीचे होते. संतवाङ्मयाची गोडी विलक्षणच होती. हेच संस्कार पुढे श्रींच्या ठिकाणी उतरले.

नारायणरावांनी ठाणे जिल्ह्यात आगाशी, बदलापूर, टिटवाळा इत्यादी विविध ठिकाणी नोकरी केली. सेवानिवृत्तीनंतर ते मुरबाडला काही दिवस आपल्या चुलत्याकडे राहून नंतर चिंचणी तालुका माहीम, जिल्हा ठाणे येथे

राहण्यास गेले.

नारायणराव यास प्रथमपत्नीपासून कृष्णा म्हणून एक मुलगा होता. त्यांचा द्वितीय विवाह माहीम येथील श्री. पेंडसे यांच्या कन्येबरोबर झाला.. या दुसऱ्या पत्नीचे नाव सौ. गंगाबाई असे होते. याच श्रींच्या मातोश्री होत. विवाहाच्या वेळी त्या अवघ्या अकरा वर्षांच्या होत्या.

भारतीय स्त्रियांना पातिव्रत्याचे बाळकडू असतेच. त्याप्रमाणे सौ. गंगाबाई पतिपरायण होत्याच, शिवाय अत्यंत प्रेमळ होत्या. घरातील नोकरचाकरांशीही त्यांचे खेळीमेळीचे वागणे असे.

## नाळ पुरताना सोन्याचा हंडा सापडला

त्या सतरा वर्षांच्या असताना तारीख १५ मे १८९३ या दिवशी (वैशाख वद्य ३०) सोमवारी, माहेरी, माहीम (तालुका पालघर) येथे आजोळघरी श्रींचा जन्म झाला. यावेळी श्रींचे मातामह घराबाहेर मुलाच्या नाळवारेसाठी खड्डा खणीत असता त्यांना धनाचा कुंभ सापडला. श्री हे त्यांच्या मातोश्रींचे पहिले अपत्य, या अपत्याच्या योगानेच 'कुलं पवित्रं, जननी कृतार्था' हे भाग्य त्या माऊलीच्या वाट्यास आले. त्यावेळी खरोखरच त्या माऊलीला कदाचित् कल्पनाही नसेल की आपला हा पुत्र महान् भगवत् भक्त होणार आहे व आपलेच नव्हे तर सर्व कुळाचे नाव उज्ज्वल करणार आहे!

श्रींचे नाव 'दत्तात्रेय' असे ठेवण्यात आले, पण लाडाने सर्व त्यांना 'दत्तू' असे म्हणत. श्रींच्या पाठीवर त्यांची दोन-तीन भावंडे वर्ष दीडवर्षाची होऊन गेली. त्यानंतर मात्र तीन बहिणी व तीन भाऊ जगले.

श्रींच्या सातव्या वर्षीच (गर्भाष्टमे) श्रींचे मौजीबंधन झाले. त्यांचे वडील श्रींची सोडमुंज होईपर्यंत चारआठ दिवस (श्रींना) 'दत्तू'स कडेवर घेऊन माधुकरीस नेत असत.

श्रींचा आवाज लहानपणी अत्यंत मधुर होता आणि संगीताचीही जाण होती. त्यामुळे त्यांचे वडील हनुमान जयंतीस कीर्तन करीत, तेव्हा साधारण दहा वर्षांचे असताच ते 'टाळ' घेऊन वडिलांची साथ करीत. त्याचप्रमाणे काही काळ मेळ्यातही पदे म्हणत असत.

## प्रतिज्ञाभंगाचे घोर प्रायश्चित्त

सन १९०६-१९०७ चा काळ असेल. त्यावेळी देशात सर्वत्रच स्वदेशप्रेम जागृत झाले होते. लोकमान्य टिळक हे त्यावेळच्या तरुणांचे व बालांचे आदर्श पुढारी होते. विलायती मालावर बहिष्कार घालणे इत्यादी

सारखे कार्यक्रम गावोगावी चैतन्याची लाट उसळवीत होते. त्यावेळी श्रींचे वय केवळ १२/१३ वर्षांचे होते, पण अत्यंत संवेदनक्षम असल्याने या चैतन्यशाली घटनांचा त्यांच्या मनावर खोल परिणाम झाला होता. त्यांनी मनाशी विलायती साखर न खाण्याची प्रतिज्ञा केली होती. पण घरात मात्र कुणालाही या गोष्टीची कल्पना नव्हती.

एकदा असे झाले की वडिलांच्या आज्ञेवरून साखरेचा गोड पदार्थ मनाविरुद्ध खावा लागला. त्यावेळी बालवय असूनही, आपल्या हातून प्रतिज्ञाभंग झाला ही गोष्ट श्रींच्या मनास इतकी लागून राहिली की आत्मशिक्षा म्हणून शालेय प्रयोग शाळेतील अर्ध्या पोफळाएवढा 'सोमल' त्यांनी खाल्ला. परिणामी १०७.५ अंश ताप चढून तीन दिवस बेशुद्ध होते. हरिकृपेने आणि त्यांच्या हातून पुढे एवढे महत्कार्य व्हावयाचे होते म्हणूनच की काय, त्यावेळी हे प्राणसंकट टळले. परंतु घडलेल्या या प्रसंगावरून बालवयातही आपली प्रतिज्ञा, आपला निश्चय आपण प्राणपणाने पाळलाच पाहिजे या विषयींची जागरूकता स्पष्ट दिसून येते.

१९०८ साली श्रींचे वडील सेवानिवृत्त झाले. वडिलांना त्यावेळी दरमहा फक्त पंधरा रुपये पेन्शन मिळत असे. यावर्षीच वयाच्या १५ व्या वर्षी श्री मराठी सातवी उत्तम प्रकारे उत्तीर्ण झाले. यानंतरचे त्यांचे माध्यमिक शिक्षण मुरुड-जंजिरा येथे होऊन ऑक्टोबर १९१३ मध्ये ते मॅट्रीक पास झाले.

सन १९१४ मध्ये वयाच्या २१ व्या वर्षी बडोद्यास, त्यांचे मामा श्री. पेंडसे हे प्राध्यापक होते, त्यांच्याकडे ते पुढील शिक्षणासाठी म्हणून गेले. 'बडोदा कॉलेज' मधून सन १९१८ मध्ये ते संस्कृत हा मुख्य विषय घेऊन बी.ए. झाले. त्यावेळी थोर देशभक्त श्री. शंकरराव देव व थोर समाजसेवक श्री. देवधर हे त्यांचे सहाध्यायी होते.

## स्त्री-मोह निपटून काढला

बडोद्यास प्रथम वास्तव्य मामांकडेच होते, पण नंतर स्वतंत्र खोली घेऊन राहात असत. असे राहात असता एकदा असे झाले की, उन्हाळ्यामुळे त्या घरमालकाची सर्व मंडळी व इतर बिऱ्हाडकरू सर्वच गच्चीवर झोपण्यास गेले होते. मध्यरात्र उलटून गेल्यावर श्रींना वाटले की आपल्याला कुणीतरी हलवून जागे करीत आहे. पाहातात तो मालकांची तरुण बालविधवा बहीण. तिने त्यांना जाग येताच ओठावर बोट ठेवून न बोलण्याची खूण केली. मोठाच अवघड प्रसंग उद्भवला! ओरडायचीही सोय नव्हती, कारण ती मुलगी सर्व उलट करूनच सांगणार! तेवढ्यात एकदम

मनात विचार आला की काहीही करून या प्रसंगातून सुटका करून घेतली पाहिजे. त्यांनी त्या मुलीस 'करंगळी' दाखवून जाऊन येतो म्हणून खूण केली आणि तेथून जिना उतरून जे सटकले, ते परत दुसऱ्या दिवशी सकाळी आपले सामान नेण्यासच तेथे गेले.

हा मोहाचा प्रसंग असा प्रसंगावधान राखून टाळला. पण एकदा अगदी, याउलट प्रकार घडला. एकदा देवळात देवदर्शनास गेले असता अत्यंत रूपवान् अशी स्त्री नजरेस पडली. मनास वारंवार बजावूनही नजर वरचेवर तिच्याकडेच वळू लागली. मोठ्या प्रयासाने मन आवरून तेथून निघून गेले. परत दुसरे दिवशी त्याच वेळी देवळात गेले, तो फिरून ती स्त्री दृष्टीस पडली व आदल्या दिवशीप्रमाणेच तिच्याकडे पाहण्याचा मोह होऊ लागला. तेव्हा तडक घर गाठले. तिसऱ्या दिवशी परत त्या वेळेला देवळात जावे, कदाचित् ती स्त्री फिरून दृष्टीस पडेल असा विचार मनात येऊ लागला. तेव्हा मात्र मनास बजावले की आता मात्र हद्द झाली, आता परत दृष्टीस हा मोह झाला तर डोळे फोडून घेण्यात येतील. तेव्हा बाबा रे, सावध हो! नेत्रांनो, लक्षात घ्या, फिरून तिकडे दृष्टी वळली तर तुमची धडगत नाही. आणि काय आश्चर्य! असे बजावल्याबरोबर मनाचे सर्व चाळे थांबले व मन एकदम शांत झाले. फिरून म्हणून नेत्रांना 'स्त्री' या विषयासंबंधी मोह उत्पन्न झाला नाही.

## धर्मकारणास जीवन वाहिले

बडोद्यात शिक्षणासाठी असता याप्रमाणे ह्या दोन महत्त्वाच्या घटना घडल्या. पण एकंदरीत हा शिक्षणाचा काळ आनंदात गेला असावा. श्री. शंकरराव देव, श्री. देवधर व श्री. दत्तात्रेय नारायण कर्वे या तिन्ही मित्रांनी या कॉलेज शिक्षणाच्या दिवसातच आपल्या आयुष्याचे ध्येय निश्चित केले होते. श्री. देव यांनी राजकारणास, श्री. देवधर यांनी समाजकारणास आणि श्री. कर्वे यांनी धर्मकारणास वाहून घेण्याचे ठरविले होते. यावरूनही धर्माचरणाकडे श्रींचा प्रथमपासूनच कल असावा असे दिसते.

पुढे अनेक वर्षांनी यापैकी श्री. देव आणि श्री. कर्वे यांची योगायोगाने गाठ पडली असता सहज बोलण्याच्या ओघात श्री. देव म्हणाले की, जसा या राजकारणात पडलो आहे तसे सुख आणि शांति अनुभवासच येत नाही असे झाले आहे. यावर श्री. कर्वे म्हणजेच श्रींनी असे उत्तर दिले होते की, आम्हाला मात्र आमच्या क्षेत्रात याउलट अनुभव आला आहे. दुःख कसे ते आतां उरलेलेच नाही. केवळ सुखच सुख अनुभवास येते.

यानंतर पुढे १९२४ मध्ये श्रींनी एस.टी.सी. ची परीक्षा दिली.

ग्रॅज्युएट (पदवीधर) झाल्यावर मामलेदारची नोकरी त्याकाळी सहज मिळत असताही तत्त्वाविरूद्ध म्हणून ती स्वीकारली नाही. एवढेच नव्हे तर सरकारी नोकरी करावयाची नाही असा त्या कालास अनुसरून त्यांनी दृढ निश्चय केला होता.

## ३. गृहस्थाश्रम आणि साधनाकावस्था

श्रींचा विवाह १९१५ मध्येच त्यांच्या भगिनीच्या विवाहानंतर त्यांच्या स्वतःच्या इच्छेविरूद्ध, मुक्काम टिटवाळा, तालुका कल्याण येथे, चौकचे श्री. श्रीधर रामचंद्र जोशी, पी.डब्ल्यूडी. त नोकरी करीत, त्यांची कन्या 'द्वारका' हिच्याशी झाला.

विवाहसमयी समर्थांप्रमाणे पळून जाण्याचा विचारही मनात आला होता. त्यांच्या वडिलांचे एक स्नेही श्री. गोपाळबुवा गणु पाटील (रा. आन्हे, पोस्ट पडघे, जिल्हा ठाणे) यांनी मुखावरून हा विचार जाणला आणि शपथ घालून खुलासा विचारल्यामुळे त्यांना हा विचार सांगावा लागला. त्यावेळी त्यांनी एकच प्रश्न टाकला, नैतिक जबाबदारीचा. त्याचा विचार करता, 'प्रारब्धास शरण' म्हणून दासबद्ध उद्दंड वृषाप्रमाणे पुढे सर्व घडले.

विवाहसमयी श्रींचे कॉलेजचे एक वर्ष फक्त झालेले होते. इंटर आर्टस्ला असतानाच विवाह झाला आणि नंतर परत बडोद्यास शिक्षणासाठी गेले असता मनात जे विचार येत ते काव्यबद्ध केले गेले. या काव्याखाली कवी गांगेय अशी नोंद असे.

त्यांचे गृहस्थाश्रमाचे दोन कालखंड पडतात. एक विवाहापासून म्हणजे १९१५ ते १९२९ पर्यंतचा आणि दुसरा इ. स. १९२९ ते १९४३ मध्ये चतुर्थाश्रम स्वीकारला, तो पर्यंतचा. या पैकी इ. स. १९१५ ते १९२९ या चौदा वर्षांतील घटनांकडे पाहिले तर इतर सामान्य लोकांप्रमाणेच त्यांच्या गृहस्थाश्रमाचे स्वरूप दिसून येते. १९२९ नंतर मात्र आयुष्यक्रमास एकदम कलाटणी मिळून परमार्थमार्गाचा सांधा जुळला आणि त्या मार्गाने आयुष्याची गाडी वेगात धावू लागली. आणि अखेर तिने मुक्कामाचे ठिकाण यशस्वीपणे गाठले.

### अध्यापन कार्याचा प्रारंभ

सन [illegible] च्या [illegible] बडोद्याहून मुरबाड, जिल्हा ठाणे येथे

वडिलांकडे आले असता, प्लेगची साथ आल्याने खेडेगावी बिऱ्हाड ठेवले होते. त्यावेळी तेथील मिशनरी हायस्कूलमध्ये दररोज ४ तास शिकवीत असत.

सन १९१८ मध्ये वयाच्या २५ व्या वर्षी बी.ए. पास झाले खरे, पण आर्थिक विवंचनेमुळे त्यावेळी ऑनर्सला बसता आले नाही. याच वर्षी मिशन हायस्कूलच्या प्रिन्सिपॉलशी तात्त्विक विरोध निर्माण झाल्याने तेथील नोकरीचा राजीनामा दिला.

पुढील वर्षी वसई हायस्कूलमध्ये नोकरी धरली पण सहा महिन्यांनी त्याही नोकरीचा राजीनामा दिला. याच वर्षी लहान भाऊ नरहरी याची मुंज झाली. नंतर १९२० मध्ये डहाणू येथे हायस्कूलमध्ये हेडमास्तर म्हणून नेमणूक झाली. पण संस्थेच्या सेक्रेटरीने वचनभंग केल्याने सात सहकाऱ्यांसहित राजीनामा दिल्याने सर्व स्कूल ओसाड पडले.

यानंतर १९२१ मध्ये चिंचणी, तारापूर येथे 'कांजी धरमसी हायस्कूल' मध्ये नोकरी धरली. येथे पगारही बरा होता. येथील नोकरी १६ वर्षे झाली. हा सर्वच कालखंड श्रींच्या आयुष्यातील अत्यंत महत्त्वाचा म्हटला पाहिजे. याच काळात श्रींच्या आयुष्यक्रमास एकदम कलाटणी मिळून नराचा नारायण होण्याच्या दृष्टीने प्रगतीला सुरुवात झाली.

## उपासनासदृश दिनचर्या

शाळेत श्री संस्कृत, गणित आणि इंग्लिश हे विषय शिकवीत. त्यावेळी घरी क्लासही घेत. पण एका वेळी फक्त दहा मुले असत. जास्त नाही, कमी नाही. आपल्या घरीच गच्चीवर शिकवीत. कुणाच्याही घरी कधी जात नसत. जे एकदा ठरवायचे ते प्राणपणाने पार पाडायचे असा स्वभाव होता. लोभाला, मोहाला बळी न पडता नेहमी त्यावर मात करीत.

रोजचा दिनक्रमही आखीव असे. रोज गीतापठण, पूजा, अर्चा वगैरे चाले. जेवणात खोडी होत्या. ताजी भाजी व दशमी फार आवडे. जेवणात खडा, गुंतवळ इत्यादी काही आढळले तर लगेच ताट बाजूस सारून चालू लागत. पण पुढे परमार्थास सुरुवात केल्यावर जे भिक्षेत मिळे ते खाल्ले जाई. कित्येकदा करपात्र भिक्षा, काला करून जेवणे इत्यादि होत असे. गृहस्थाश्रमात मात्र ह्यांचे जेवण एकदा व्यवस्थित झाले की घरातील मंडळीस हायसे वाटे.

बागेची त्यांना फारच आवड होती. तारापूरला घरी त्यांनी सुंदर बाग केली होती. कलमी गुलाबाच्या २०० कुंड्या तयार केल्या होत्या.

## सुखदुःखाचे प्रसंग

१९२३ साली श्रींच्या प्रथम अपत्याचा, मुलाचा जन्म झाला. पण दुर्दैवाने तो मृतच जन्मला. १९२३ ते १९२६ या काळात श्रींची शरीरप्रकृतीही खूप ढासळली होती. पोटदुखीचा आजार जडला होता व औषधांनी गुण येईना. १९२६ साली तर दसऱ्याच्या दिवशी प्राणांतिक जुलाब झाले. पण त्यानंतर मात्र पोटदुखीचा फारसा त्रास कधी झाला नाही. 'परमार्थमार्गास लागण्यापूर्वी ३५ वर्षांचे असताच ६० वर्षांचे दिसत असू. पाठीला पोक येई, ज्वर अंगात मुरला होता, थोडे चालले तरी दम लागे. पंडुरोग्याप्रमाणे कळा आली होती. पण एकदा झडझडून साधनेस सुरुवात केल्यावर तब्बेत इतकी सुधारली की ५० व्या वर्षी २५ वर्षांच्या तरुणास लाजवील असा उत्साह असे. कितीही झपाझप चालले तरी दम लागत नसे. आणि ज्वर पळालाच.' असे कधीमधी सांगत असत. आणि ते प्रत्यक्ष दिसतही होतेच.

सन १९२९ साली सर्वांत धाकट्या बहिणीचा विवाह झाला व एक प्रकारे कौटुंबिक जबाबदारी बरीच कमी झाली. पण त्याच वर्षी धाकट्या भावाचे शीतांग सन्निपाताने निधन झाले. त्यामुळे मनास फारच धक्का बसला व प्रपंचातील अशाश्वत सुखाचा वीट येऊन सक्रीय सवैराग्य परमार्थाची वाटचाल सुरू झाली.

## सद्गुरुकृपेची तीव्र ओढ

त्यातच याच वर्षी (१९२९) श्री श्रीधरस्वामी बिडवाडीकर ऊर्फ रावजीबुवा या सत्पुरुषाची काही निमित्ताने गाठ पडली व पूर्वीचे संस्कार उफाळून आले. त्यांच्या दर्शनाने व संगतीने विषयाच्या ठिकाणी वैराग्य उत्पन्न होऊन भक्तिज्ञानाची उत्कंठा लागली. आपल्यावर त्यांची कृपा व्हावी म्हणून रात्रंदिवस मनास तळमळ लागली. ता. १३/९/३० ला चिंचणीहून श्री रावजीबुवा (लालबाग, मुंबई) यास विनंतीवजा जे पत्र लिहिले गेले, त्यावरून श्रींच्या त्यावेळच्या मुमुक्षुत्वाची कल्पना येऊ शकते.

जयजयाजी गुरुनाथा । दास ठेवितो पदी माथा।
विनंती आयकावी आता । दयाघना श्रीधरा ।।१।।

या संपूर्ण पत्रातून सद्गुरुनिष्ठा, सद्गुरुविषयींची त्यांची ब्रम्हभावना, तसेच दीनता, नम्रता, ज्ञानभक्तिप्राप्तीची तळमळ, पूर्ण

सद्गुरुकृपा व्हावी ही दुर्दम्य इच्छा, तसेच हत्ताप शांत व्हावा म्हणून सद्गुरुंना शरण जाऊन केलेली प्रार्थना इत्यादी अनेक गोष्टी दिसून येतात.

## रामनाम मिळाले

या विनंतीचा उपयोग एवढाच झाला की १९३० सालीच श्री. रावजीबुवा यांच्या लालबाग येथील मठात, त्यांच्याकडून त्रयोदशाक्षरी राममंत्र मिळाला. याप्रमाणे मंत्र मिळाल्याने भक्तिज्ञानासंबंधीची तळमळ अधिक तीव्रतर झाली व यासंबंधी अधिक मार्गदर्शन व्हावे अशी विनंती सद्गुरूंना केली गेली. तेव्हा ३॥ कोटी जप करून ये, मग पुढचा मार्ग सांगेन अशी आज्ञा झाली. ही आज्ञा झाल्यावर श्रींचा रोजचा दिनक्रमच बदलून गेला. कधी एकदा जपसंख्या पुरी करतो व सद्गुरू कधी आपणास पुढील मार्ग दाखवतील हाच एक ध्यास त्यांच्या मनाला लागला व त्या दृष्टीने तळमळीने साधनास प्रारंभ झाला.

## रामानेच मार्गदर्शक धाडला

यातच १९३० पासून सतत, महाभगवद्भक्त, पूर्ण विरक्त, गूढलिंगज्ञानी, श्री बाबा गंगादास यांची संगती घडली. हे चिंचणी, तारापूरच्या किल्ल्यावर राहात असत. त्यांचे 'ईश्वरदासां' वर, बाबूवर म्हणजेच श्रींच्यावर अत्यंत निर्हेतुक प्रेम होते. त्यांच्याच आशीर्वादाने श्रीरामचरितमानसाची गोडी लागली व त्याचे रहस्य प्राप्त झाले. संतप्रेम काय असते याचा रोमांचकारी अनुभव श्रींना त्यांच्या सान्निध्यात आला. श्रीरामकृपेनेच असल्या बाळवृत्तीत राहणाऱ्या संताची ओळख पटली. बाजारी संत कुठेही भेटतात, पण दोन वर्षे दोघे एकमेकांची परीक्षा करीत होते. बाबा एक दिवस श्रींना म्हणाले 'बाबू! (त्यांच्या 'बाबू' या शब्दात काय जादू होती! प्रेम! प्रेम! केवळ शुद्ध प्रेम!) दो साल हुए तू मेरी परीक्षा करता है और मैं तेरी परीक्षा कर रहा हूँ। ऐसा ही करना चाहिए। गुरु करना बसके। सोना लेना कसके-

याप्रमाणे श्रींना मंत्रगुरु रावजीबुवा व रामायणगुरु श्री बाबा गंगादास या दोन्ही सत्पुरुषांची पूर्ण कृपा लाभली. आणि १९३० पासून त्यांची कठोर साधना सुरू झाली. म्हणून १९२९ ते १९४३ पर्यंतचा, त्यांनी चतुर्थाश्रम स्वीकारून ब्रम्हनिष्ठ सद्गुरु श्री वासुदेवानंद सरस्वती स्वामीमहाराज यांच्याकडून दंडग्रहण करीपर्यंतचा काळ, हा कठोर साधनेचा काळ ठरतो. यावेळी गृहस्थाश्रमात राहूनच परमार्थसाधना कशी करता येते याचे एक उदाहरणच श्रींनी लोकांना घालून दिले आहे.

## निष्कामकर्म साधन

पू. रावजी बाबांकडून मंत्रदीक्षा जरी १९३० मध्ये मिळाली असली तरी १९२८/२९ पासूनच साधनेस सुरूवात झाली होती. त्या काळात पुष्कळ काव्य झाले. त्यातून श्रींनी आपल्या मनास, इंद्रियास केलेला बोध, सद्गुरुप्राप्तीची तळमळ, तसेच आपल्या स्वतःच्या बळावर हा भवसागर तरून जाणे अशक्य आहे ही जाणीव असल्याने 'रामाचा केलेला धावा' या सर्व गोष्टींवरून मनास किती आच लागली होती ते कळून येते. त्या सर्व काव्यांत 'ईश्वरदास' असा स्वतःचा उल्लेख केलेला दिसून येतो. यावेळी 'ईश्वरदास रामदासी' स्वतःस म्हणवीत यावरून रामदासी संप्रदायाकडे कल होता व त्यास अनुसरून उपासना चालू होती असे दिसते. घराशी संबंध केवळ आवश्यक कर्तव्ये करण्यापुरताच राहिला होता. 'ठायींच बसोनि करा एक चित्त। आवडी अनंत आळवावा।' असे घरी राहून सर्व कर्तव्ये करीत असता सतत अनंतास आळविणे चालू होते. त्यामुळेच 'सुखे येतो घरा नारायण।' याचा अनुभव घेता आला.

## पहिले विघ्न आप्तांचे

प्रातःस्नानाचा नियम ह्याच काळात केला गेला. पहाटे ४ ला उठून नित्यक्रम आवरून गार पाण्याने प्रातःस्नान, सूर्योदयापूर्वीच संध्या, गायत्रीजप, ब्रम्हयज्ञ व इष्टदेवतेचा जप याप्रमाणे सकाळचा कार्यक्रम असे. शाळेतून मधल्या सुट्टीतही येऊन, हातपाय धुऊन, वस्त्रे बदलून जप करीत व परत शाळेत जात. एक क्षणही कसा वाया जाणार नाही यासंबंधी सतत जागरूक असत. तरीही अखेर असे वाटले की घरात राहून मनासारखे साधन होत नाही, उपाधी मागे लागतात. म्हणून यासाठी काय करावे अशी तळमळ लागली होती. या साधनकाळात वेळच्यावेळी स्नानसंध्या वगैरे असे. तसेच दाढीजटाही ठेवल्या होत्या. त्यामुळे सभोवतीची माणसे चेष्टा करीत. त्यांच्या मावशी बडोद्यास होत्या, त्यांनी तर बडोद्यास गेल्यावेळी 'तू मी सांगते त्याप्रमाणे राजमहल रोडवर झाडाखाली नुसता बसून राहा. म्हणजे मी तुला ८-१० दिवसात १/२ हजार रुपये मिळवून देते.' असे उद्गार काढले. त्यावर 'पैसा मिळवण्यासाठी साधन नाही' असे उत्तर श्रींनी दिले. असे प्रकार जगात चालतात ह्याची जाणीव श्रींना होती. कदाचित मावशीच्या निमित्ताने श्रीरामाने परीक्षा पाहिली असेल अशी श्रींची भावना झाली. साधना करू लागल्यावर पहिले विघ्न आपल्या आप्तजनांकडूनच येत असते असे श्री नेहमी म्हणत असत. 'अरे, गार पाण्याने कशाला आंघोळ करतोस,

बाधेल.' अशा तऱ्हेने अगदी प्रेमानेही सूचना येते. पण यावेळीच मनाचा दृढ निश्चय करून या मोहाचा त्याग केला पाहिजे व झडझडून साधन केले पाहिजे. एखादाच नियम करावा पण तो कसोशीने पाळावा असे ते म्हणत व त्यांचे सांगणे नेहमी 'आधी केले मग सांगितले' असेच असे.

## नाम सप्ताहाचा प्रभाव

एकीकडे अशा रीतीचे आत्मोन्नतीसाठी खडतर अनुष्ठान आरंभिले होते तरी पण व्यावहारिक कर्तव्यात कधीच कसूर केली नाही. केवळ कौटुंबिकच नव्हे तर सामाजिक बाबतीतही त्यातल्या त्यात सवड काढून जे शक्य असेल ते कार्य हाती घेतले जाई. १९३१ मध्ये दोन महिने चिंचणी गावात चोरांचा सुळसुळाट झाला होता. हा त्रास बंद होण्यासाठी श्रीरामाज्ञेने श्रावणात नारळी पौर्णिमेनंतर नारायणाच्या मंदिरांत 'रघुपति राघव राजाराम पतित पावन सीताराम' या एका मंत्रानेच नामसप्ताह चालू केला होता. तिसऱ्या दिवसापासूनच चोरांचा त्रास बंद झाला. दोन दोन तासांचा पहारा ठेवला होता. प्रत्येक पहाऱ्यात निदान चार व्यक्ती असत. टाळ फक्त असत. वीणा नव्हती. श्रावण वद्य अष्टमीस सप्ताहाची समाप्ती झाली. यावेळी भजनीमंडळाचे आभारप्रदर्शनपर प्रार्थना म्हणताना श्रींचा कंठ भरून येऊन नेत्रांतून अश्रुधारा वाहात होत्या, म्हणवेना, शेवटी महत्प्रयासाने प्रार्थना पुरी केली.

त्याचप्रमाणे श्रीनागेश्वर, जे पूर्वी शांत रम्य स्थान होते, पण या सुमारास जीर्ण झाले होते, कधी भूमीस येईल व कोणाच्या डोक्यावर पडेल याचा नेम नाही अशी स्थिती पाहून, त्याच्या जीर्णोद्धारासाठी श्रींनी सर्व ग्रामस्थांची प्रार्थना केली आणि या मंदिराचा जीर्णोद्धार करवून घेतला.

## ब्रम्हचर्ययुक्त मंत्रपुरश्चरण

या प्रकारे साधना चालू असताच '३॥ कोटी जप करून ये मग पुढील मार्ग सांगेन.' हे सद्गुरूंचे वचन मनात सारखे घोळत राहिले होते. त्यामुळे १९३२ साली चैत्र शुद्ध प्रतिपदेस चिंचणीला घराशेजारीच स्वतंत्र झोपडी बांधून अग्निस्पृष्ट फराळाचे पदार्थ फक्त भक्षण करून, ब्रम्हचर्ययुक्त मंत्रपुरश्चरण श्रीगुरूंच्या आज्ञेप्रमाणे सुरू केले. रोज साधारण ४० ते ५० हजार जपसंख्या पुरी होई. नोकरी सांभाळून हे सर्व केले जाई. पहाटे ४ ला उठून नित्यक्रम आवरून, स्नानसंध्या वगैरे करून जपास आरंभ होई, तो शाळेची वेळ होण्यापूर्वी फक्त थोडा वेळ थांबत. फराळ करून कपडे बदलून कामावर जात. मधल्या सुट्टीतला वेळही वाया घालवीत नसत. घरी येऊन

हातपाय धुऊन वस्त्रे बदलून परत करता येईल तितका जप करून परत वेळेवर शाळा गाठत. संध्याकाळी शाळेतून आल्यावर परत स्नान करून मंत्रानुष्ठानास सुरुवात होई, ते ठराविक संख्या पुरी होईपर्यंत झोपत नसत. झोप येऊ लागली तर शेंडी खुंटीला बांधून ठेवीत. म्हणजे डुलकी आलीच तर हिसका बसून जाग येई. पण अशी वेळ फारशी येतच नसे. प्रतिवर्षी १।। कोटी जप तरी होई याप्रमाणे ३।। कोटीच्या ऐवजी ४।। कोटी जप पुरा करून श्रीगुरुंच्या भेटीस गेले व पुढील मार्गदर्शनाची विनंती केली. तेव्हा 'राम तुला सर्व सांगेल' हे थोडक्यात आशीर्वादात्मक उत्तर मिळाले व त्याप्रमाणे त्या परम दयाघन रामरायाने सर्व काही स्पष्ट सांगून निर्भय केले.

मन रामी रंगलेले असल्याने केवळ नामजपानेच श्रींची कुंडलिनी आपोआप जागृत होऊन योगमार्गातील दिव्य अनुभव येऊ लागले. अंगास एक प्रकारचा सुवास येऊ लागला. सहज मनात एखादी गोष्ट आली तर ती पुरी होई. एकप्रकारे वाचिक तपही झाल्याने वाक्‌सिद्धी प्राप्त झाली. सहज बोलत ते खरे होई. अशा प्रकारे १९३० पासून दिवसामागून दिवस, वर्षामागून वर्षे, साधना अधिकाधिक तीव्रतर होऊ लागली, व देहाच्या ठिकाणी तेज दिसू लागले.

## साधनसिद्ध तीर्थयात्रा

१९३३ साली मे महिन्याच्या सुट्टीत एकट्याने फराळावर राहून प्रवास केला. पण प्रवासातही नित्यक्रमात खंड पडू देत नसत. कुंभमेळा, मथुरा, वृंदावन, गोकुळ, हरिद्वार, ऋषिकेश, स्वर्गाश्रम, अयोध्या, प्रयाग काशी, गया इतका प्रवास झाला. आधीच रेल्वेचे टाईमटेबल पाहून, सूर्योदय, सूर्यास्त केव्हा आहेत, वाटेत कुठली स्टेशन्स लागतात, कुठे किती वेळ गाडी थांबते याचा अभ्यास करून योजनापूर्वक त्या त्या स्थानकावर संध्येच्या वेळा चुकणार नाहीत अशा रीतीने प्रातःस्नान, सायंस्नान करून संध्या वगैरे करून व्यवस्थित गाडी गाठत. याप्रमाणे करीत असता हरिद्वारहून थर्डक्लासने ते अयोध्येस जात असतांना फक्त एकदा प्रातःस्नान चुकले. यानंतर २८-१-५९ ला मुंबईहून परांड्यास रेल्वेने जाताना परत एकदा प्रातःस्नान चुकल्याने भस्मस्नानावर भागवावे लागले. म्हणजे १९३३ ते १९५९ या सव्वीस वर्षात एकदाही नियमात खंड पडला नाही व १९५९ नंतर शेवटी महासमाधीपर्यंतही कधीही नियमात खंड पडला नाही.

याप्रमाणे श्रीगुरुंच्या ठिकाणी पूर्ण ब्रम्हभावना ठेवून दृढ निष्ठेने नाम घेतल्याने बाबा गंगादासांच्या कृपेने श्रींना निर्विकल्पाची प्राप्ती होऊन ता. २७।१।३४ या दिवशी रात्रीं १ वाजल्यानंतर जीवनमुक्तता प्राप्त झाली.

## रामकृपेने ज्ञानाचे रहस्य गवसले

त्या दिवशी काही निमित्ताने ते रात्री बाबा गंगादासांकडेच वस्तीला राहिले होते. मध्यरात्रीच्या शिवपूजेतून निवृत्त झालेले बाबा परम प्रसन्न होते. आणि तिसरे कोणी माणूस नव्हते. बाबांनी श्रींना हाक मारली, 'बाबू जल्दी आ जा! अब ज्ञानका रहस्य एकही बात में कहूंगा। तेरी लायकात हो तो परचीती मिल जायेगी देख! जैसे है वैसा रहना, कुछ बनना नही', त्यांच्या मुखांतून निघालेले हे वाक्य श्रींच्या हृदयात प्रविष्ट होताच सर्व वेदान्तांच्या व भगवद्गीतेच्या उपदेशाचा लख्ख प्रकाश हृदयात पडला. त्या वचनांतील रहस्य श्रींच्या अंतःकरणाच्या हृद्पटावर अविस्मरणीय, चिरस्थायी रीतीने वज्रलेपासारखे चित्रित केले गेले व अपूर्व अवर्णनीय परमानंदमय दशा प्राप्त झाली. 'शब्दशक्तेर चिन्तत्वात् शब्दादेवापरोक्षधीः' ही श्रीमदाचार्योक्ति सत्यसृष्टीत उतरलेली श्रींनी प्रथम अनुभवली! त्यावेळीच श्री बाबा गंगादासांनी त्यांच्या प्रियतम बाबूवर (श्रींवर) अमोघ आशीर्वादांची वृष्टी केली. त्यापैकी एक आशीर्वाद 'श्रीतुलसीदासजी तेरे मुखसे बोलेंगे' हा होता. व त्या आशीर्वादाच्या प्रभावाने पुढील आयुष्यांत श्रींच्या हातून 'श्रीरामचरित मानसाचा' समवृत्त समछंद अनुवाद व 'श्री मानस गूढार्थ चंद्रिका' ही विस्तृत टीका यांचे लेखन झाले, अशी श्रींची दृढ श्रद्धा होती.

## धन्योस्मि ! कृतकृत्योस्मि !

त्यानंतर परत ता. २८/१/३४ रविवार दुपारी १॥ वाजल्यावर तशीच स्थिती परत प्राप्त झाली. ही अवस्था दीड दिवस टिकली होती व या दिवसापासून खरी निर्भयता प्राप्त झाली.

'धन्योस्मि, कृतकृत्योस्मि! प्राण देहातून निघून न जाताच आज मी मरण पावलो! वा! वा! आनन्द! धन्य राम! धन्य नाम! धन्य दास! धन्य गुरु! धन्य शास्त्र!

बा मृत्यो! ये! आता तू केंव्हाही आलास तरी काय करणार! हे चर्ममय गृह घेऊन जाणार एवढेच ना? ने! खुशाल ने!!

आता या मरणामुळे पुन्हा मरण्याचा प्रसंगच चुकला! मरणच नाही, मग जन्म तरी कोठून!

खासा न्याय! ज्या रत्नास शोधीत होतो ते सापडले, पण ते सापडताच शोधणारा नाहीसा झाला! जिच्या सामर्थ्याची फार भीती वाटत होती व जी फारच विचित्र रचनापटु, तिचा थांगपत्ताच नाहीसा झाला! खऱ्याचे खोटे व खोट्याचे खरे!

ज्यासाठी त्यागबुद्धी उसळत होती, त्या त्यागबुद्धीचाच त्याग झाला. काळ्याचे पांढरे व पांढऱ्याचे काळे!! पण एवढे झाले तरी बेटा प्रारब्ध स्वभावप्रकृती सोडत नाही. सोडो न सोडो, राजा मरो, राणी सती जावो. साक्षीला काय सुख दुःख!

किती सुंदर मार्ग! सरळ, सोपा, फुकाचा, सुखाचा, स्वतःचा! खाडा नाही, काटा नाही, नेम नाही, धर्म नाही. पण एक, एक गुरुवर विश्वास! विश्वास! श्रद्धा! दृढ विश्वास! धन्य श्रद्धे! काय तुझे सामर्थ्य! काय तुझी लीला! मर्त्याचा अमर! जन्मशीलाचा अजन्मा! रंकाचा सार्वभौम! दुष्टाचा सुष्ट! विषयीचा अविषयी! दुकाळाचा सुकाळ करतेस! धन्य धन्य तुझी! तू काय करणार नाहीस! पण... पण... लवकर हाती येत नाहीस ना! येऊ लागलीस की तुझी सवत 'संशय' झडप घालून तुला पार गिळून टाकते! पण तुझी माता ही धन्य! तुला पुन्हा देतेच!

।। जागृती ।।

तो निजलेला जागा झाला जेव्हा । ते स्वप्न निमाले तेव्हा ।।१।।
या स्वप्नीं तो सदैव जागृत आहे । ती निद्रा दूरचि राहे ।।२।।
की मरूनी जे सदेह लोकीं जगती । ते धन्य साच या जगती ।।३।।
तो जादूचा प्रेरक मोठा कुशल । पाडिले रिपू सपशेल ।।४।।
व्यतिरेकाने ग्रंथी तोडुनि मोठा । दाविले सर्व हा खोटा ।।५।।
ही लवणाची जळांत पुतळी मिळतां । तोयचि ती झाली बघता ।।६।।
जे आजवरी दोषपूर्ण की दिसले । गुणपूर्ण आज ते झाले ।।७।।
ते मौनानें तेणें स्पष्टचि कथिलें । अव्यक्ती व्यक्तचि झाले ।।८।।
'मी' नाहींसा जेव्हा झालों पाहे । 'तो' आहे सर्व दिसे हें ।।९।।
परि जेथें हो 'मी'च राहिलो नाहीं । ''तू'' 'तो'ही कैसी ग्वाही ।।१०।।
चाल - 'मी' 'तू' 'तो' नाहीं वार्ता । जें असे, असे तत्त्वतां ।
जो नाहीं कर्ता भोक्ता ।
तो तोची रे शेष आता की आहे । हे सर्व विचित्रचि पाहें ।।११।।
जगिं प्राप्य असें आतां उरलें नाहीं । परि घडो, घडे जे काही ।।१२।।
जें कार्यत्वें होतें करणे कृत्य । ते झालें कृत, आश्चर्य ।।१३।।

## पिशाच्चेच पिशाच्चे

एकदा असे झाले की, प्रातःस्नानासाठी तारापूरला समुद्रावर निघाले होते. त्या दिवशी घड्याळ बंद पडले की काय झाले कुणास ठाऊक, पण नेहमींपेक्षा खूपच लवकर बाहेर पडले होते. समुद्र किनाऱ्याकडे जाताना

पाहतात तो आपल्यापुढे बरीच मंडळी चालली आहेत. पाहता पाहता ती मंडळी पाण्यापर्यंत गेली व एकदम दिसेनाशी झाली. तेव्हा लक्षात आले की ही बहुधा पिशाचे असावीत कारण स्मशानभूमी तेथे जवळच होती. तोपर्यंत पिशाच्चयोनींवर वगैरे विश्वास नव्हता. राहण्यास तर जेथे जात, तेथे भूतपिशाच्चांनी झपाटलेले वाडेच पसंत करीत. कारण भाडे कमी पडे. आणि श्रींचे वास्तव्य तेथे झाल्यावर कुठल्याही घरात त्यांना वा त्यांच्या कुटुंबियांना कधीच कुणी त्रास दिला नाही. पुढे आश्रम घेतल्यानंतरही परांडा, उस्मानाबाद येथेही असेच झाले.

## हा पेढा मुलगा झाला म्हणून, आणि हा, तो गेला म्हणून

याप्रमाणे १९३४ सालच्या सुरुवातीसच नेमलेल्यापेक्षाही अधिक जपसंख्या पुरी झाली होती. श्रीगुरुंच्या बाबा गंगादासांच्या आशीर्वादाने योगमार्गांत प्रगती होऊन स्वस्वरुप ज्ञानही प्राप्त झाले होते. त्यामुळे येथून पुढचे श्रींचे आयुष्य केवळ परोपकारार्थच होते. एकीकडे प्रपंचाचा गाडा ओढीत असता मनाचा चतुर्थाश्रम घेण्याकडे कल होत होता. कदाचित् या कारणानेही असू शकेल, पण तो दिव्य अनुभव आल्यानंतर ज्ञानेश्वरांनी म्हटल्याप्रमाणे, 'वैराग्याचे गाठुले । अंगी त्राण होते भले । तेहीं नावेक ढिले । तेव्हा करी ।। (१८.१०७७) या न्यायाने यमनियम जरा सैल केले असावे. परिणामी १९३५ साली सौ. कमलाबाई कर्वे यांना पुत्ररत्नाची प्राप्ती झाली. त्यावेळी त्या माहेरी गेल्या होत्या. रीतिप्रमाणे बाळलेणी आणि पेढे वगैरे घेऊन श्री सासुरवाडीस आले. आल्यावर मुलाची कुंडली पाहून आठ दिवसातच हा जाईल असे त्यांनी तेथील मंडळींस सांगितले. त्याप्रमाणे तो बालक जन्मल्यापासून आठवे दिवशीच धनुर्वाताने गेला. श्रींनी परत निर्विकारपणे चिंचणी तारापूर गाठले. दुसऱ्या दिवशी शाळेत कामावर गेल्याबरोबर सर्व सहकारी भोवती जमले व मुलगा झाल्याबद्दल पेढे मागू लागले. तेव्हा खिशात पेढे आणलेच होते. त्यातील प्रत्येकाच्या हातावर एकेक ठेवून सांगितले, 'हा पेढा मुलगा झाल्याबद्दल.' नंतर प्रत्येकास आणखी एकेक पेढा दिला व सांगितले 'हा पेढा तो गेल्याबद्दल.' सर्व सहकारी आ वासून पाहातच राहिले.

## सौभाग्यवतीला दीक्षा दिली

श्रींना प्रथम अपत्य १९२३ साली झाले होते. त्यानंतर जवळ जवळ १२ वर्षांनी हा दुसरा मुलगा झाला आणि गेला. कदाचित् स्वानुभवप्राप्तीनंतर श्रींच्या मनात चतुर्थाश्रम स्वीकारण्याची इच्छा होतही

असेल. आपण चतुर्थाश्रम स्वीकारला तर पत्नीस एकादे अपत्य असेल तर त्याच्या आधारे जीवन कदाचित् सुसह्य होईल असा विचारही श्रींच्या मनात असेल. मात्र ह्या द्वितीय पुत्राच्या निधनानंतर १९३५ सालींच सौ. कमलाबाई कर्वे ह्यास मंत्रदीक्षा दिली असा स्पष्ट उल्लेख आहे. पूर्वाश्रमात आणखी कोणास दीक्षा दिल्याचे आढळून येत नाही. ह्याच श्रींच्या पहिल्या शिष्या. येथून पुढे पतिपत्नीसंबंध संपून गुरुशिष्यसंबंध प्रस्थापित झाला असावासे वाटते. (श्री त्यांना द्वारकाताई म्हणत.)

## सीतामाईचे भावदर्शन

तसेच श्रींच्या सांगण्यात येत असे की, सर्व राममय पाहण्याचा अभ्यास चालू होता. स्वतंत्र झोपडीत राहात असतच. एकदा संध्याकाळच्या वेळी सौ. ताई दूध घेऊन झोपडीशी आल्या. पुरेसा प्रकाश नव्हता. त्यामुळे नक्की कोण आले आहे हे कळले नाही. पण बांगड्यांचा आवाज झाला तेव्हा सीतामातेसमान समजून हात जोडले गेले. सौ. ताई आणखी पुढे आल्या तशी ओळख पटली. पण एकदा मातेसमान समजून नमन केले गेले, त्यामुळे तेथून पुढे पत्नी या नात्याने कधी पाहिले नाही.

## मातृनिधन

याप्रमाणे १९२९ साली जी साधना सुरू झाली होती, त्या साधनेने परमोच्च बिंदू गाठला होता. आता मिळवायचे काही उरलेच नव्हते. आता मिळालेले वाटायचे होते. अशा परिस्थितीतच १९३६ मध्ये टिळक पंचांगीय वैकुंठ चतुर्दशीस, बरेच दिवस भ्रान्तमस्तक असलेल्या मातेस भाजून मृत्यु आला. चुलीशी दुपारी ४।। वाजता शेंगदाणे भाजत असता एकाएकी लुगडे पेटले व संध्याकाळी ६।। वाजता त्यांनी इहलोक सोडला.

१९२९ मध्ये धाकटा भाऊ 'शीतांग सन्नीपाताने गेला तेव्हा श्रींच्या मनास जो धक्का बसला होता त्यावेळेपेक्षा श्रींची मानसिक अवस्था यावेळी अगदी वेगळी असल्याने मातृनिधनाचे दुःख त्याना मुळीच जाणवले नाही. मात्र माता परलोकवासी झाली म्हटल्याबरोबर प्रापंचिक जबाबदारीतून मुक्त झाल्यासारखे वाटू लागले असावे. कारण त्यानंतर लवकरच १ फेब्रु. १९३७ ला राजीनामा देऊन नोकरी कायमची सोडली.

# ४. वानप्रस्थाश्रम आणि संन्यासग्रहण

फेब्रुवारी १९३७ मध्ये नोकरीचा राजीनामा दिल्यानंतर श्रींनी पायी सज्जनगडावर जाण्याचे ठरविले. त्यावेळी पहिल्या मुक्कामापर्यंत बाबा गंगादास श्रींच्या बरोबर होते. त्यांनी परत जाताना श्रींना शुभाशीर्वाद दिला होता. या यात्रेतच (चिंचणी-तारापूर, कुलाबा जिल्हा ते सातारा जिल्ह्यातील सज्जनगड हे अंतर साधारण दोनशे मैल आहे.) साताऱ्याच्या अलिकडे १५-२० मैलांवर दुपारी १२ चा सुमार झाला. पायही थकले होते, म्हणून एका झाडाखाली विश्रांतीसाठी म्हणून श्री बसले. बरोबर शिदोरी काहीच नव्हती म्हणून सहज गीतेतील 'अनन्याश्चिंतयन्तो मां' या श्लोकाचा विचार आला व श्रीरामप्रभू दुपारच्या भोजनाची काय व्यवस्था करतात पाहू या असे वाटले. थोडा वेळ गेल्यानंतर लांबून एक शेतकरी येताना दिसला व हळूहळू तो श्रींच्या जवळ येऊन ठेपला. त्याने घोंगड्यातून शेंगा, गूळ, केळी वगैरे पुढे ठेवून वंदन केले. श्रींना विस्मय वाटला आणि प्रभूची परीक्षा घेतली म्हणून दुःखही झाले. त्या शेतकऱ्यास ह्या जिनसा का आणल्यास म्हणून विचारता त्याने सांगितले, 'लांब झाडाखाली कोणीतरी बसले आहे असे पाहिले व एकदम प्रेरणा झाली की दुपारची १२ ची वेळ आहे. आपण काहीतरी खावयाचे जिन्नस त्यांना नेऊन द्यावे. त्याप्रमाणे घेऊन आलो.' हे ऐकून रामास आपण विनाकारण शिणवले असे मनात येऊन श्रींचे डोळे भरून आले.

### रामायणाची गोडी वाढू लागली

१९३७ मध्ये चिंचणीला असतानाच सामुद्री मातेच्या देवळात ते रोज तुलसीरामायणावर प्रवचने करू लागले. ही पहिली वेळ होती. त्यावेळी संपूर्ण रामायणावर प्रवचने करण्यास साधारण ५ महिने लागले. बाबा श्री गंगादास रोज १।। मैल दूर रात्री श्रवणास येत असत! धन्य बाबा!

यानंतर १९३७-३८ मध्ये श्रींनी बिऱ्हाड मोडून, चिंचणी सोडून एकांतात राहाण्याचे ठरविले. त्यावेळी श्रींची मनःस्थिती 'जें विखें रांधिली रससोये । जै जेवणारा ठाऊकी होय । तै तो ताटचि सांडूनि जाये । जयापरी ।। तैसी संसारा या समस्ता । जाणिजे जें अनित्यता । तै वैराग्य दवडिता । पाठी लागे ।।' अशा प्रकारची होती. ते चिंचणी-तारापूरहून निघून चौकला आले व एकटेच चौक, कुलाबा जिल्हा येथे धान्येश्वराच्या पडवीत वास्तव्य केले. १९३८-३९ मध्ये श्री धान्येश्वर मंदिरात राहात

असताही संपूर्ण रामचरितमानस सांगितले. त्यावेळी त्यांना ९ महिने लागले.

या ठिकाणी २/३ वर्षे साधारणतः मुक्काम झाला. अधून-मधून प्रवासास जाणे होई. पण परत चौकला येत असत. येथेच एकदा विहिरीवर स्नानास गेले असता सर्पाने दंश केला. पण काही औषध न घेता बरे वाटले.

यावेळी शहापूर, नरसापूर, भोर संस्थानातील बनेश्वर, करंजाई देऊळ अशा विविध ठिकाणी जाणे झाले. एकांत, निर्जन स्थानी खुशाल राहात. १९३६ ते १९३८ हा सर्व काळ फराळावर काढला. खजूर, केळी व रात्री भिजत घातलेले एक मूठभर शेंगदाणे एवढाच आहार असे. कुणी दूध आणूनच दिले तर घेतले जाई.

## नर्मदेच्या कुशीतील साधना

यानंतर एकदम दूर नर्मदेच्या काठी जाणे झाले. एक तर साक्षात्कार करून घेणे किंवा देहविसर्जन हे दोनच पर्याय ठरविले होते. नर्मदातटाकी घोर अरण्यात श्रींनी अहिल्यादेवींनी बांधलेल्या कोटेश्वर मंदिरात ११ दिवस राहून अनुष्ठान करण्याचे ठरविले. बरोबर ११ दिवसच फक्त पुरतील एवढेच फराळाचे घेऊन (खजूर शेंगदाणे गूळ) जाणे झाले. ह्या स्थानाभोवती १२ मैल सर्वत्र जंगल पसरलेले. वाघाच्या डरकाळ्या व अस्वलाच्या आरोळ्या पहाटे व रात्री ऐकू येत. मोठे मोठे भुजंग भरपूर होते. अगदी निर्मनुष्य स्थान होते. अशा त्या शिवमंदिरात मुक्काम असता एक दिवस अचानक एक वृद्ध ब्राम्हण तेथे आला. भोजनाची वेळ, त्यात अतिथी पाहून श्रींनी आपल्या जवळील पदार्थातून खजूर शेंगदाणे इत्यादी त्यास देऊन तृप्त केले. खाऊन पिऊन आशीर्वाद देत तो ब्राम्हण तेथून बाहेर पडला न पडला, तोच श्रींच्या मनात आले, हा इतका वृद्ध ब्राम्हण इतक्या घोर अरण्यात आला कसा? मनात हा विचार येताच तात्काळ धावत जाऊन रस्त्यावर खूप दूरवर शोध घेतला, पण तो ब्राम्हण कुठे दिसला नाही. यावरून त्या वृद्ध ब्राम्हणाच्या रूपाने श्रीशिवजींनीच दर्शन दिले असावे असे श्रींना वाटले.

## सगुण दर्शनाचा सोहळा

याप्रमाणे बरोबर मोजक्याच आणलेल्या अन्नपदार्थातील काही भाग दिला गेल्याने उरलेले दिवस ते पदार्थ पुरणे शक्यच नव्हते. पण श्रीबाबा गंगादासांच्या शब्दावर पूर्ण विश्वास असल्याने जराही चिंता उत्पन्न झाली नाही. आणि खरोखरच अनुष्ठान संपते न संपते तोच 'जय सियाराम' असा घोष करीत ३/४ साधू देवळात आले. हे वास्तविक रामचतुष्टयच तेजस्वी सगुण रूपात प्रकट झाले होते. श्रींनी त्यांस ओळखून चरण घट्ट धरले व

त्यानी ही प्रेमाने श्रींना आलिंगन दिले व सर्व स्वाऱ्या तेथून अंतर्धान पावल्या. ज्या उद्देशाने हे कठोर अनुष्ठान केले होते तो अशा रीतीने सुफळ संपूर्ण झाला. नंतर एक माणूस कमी पडलेले फराळाचे सामान घेऊन बरोबर वेळेवर अचानक आला.

## सर्प व्याघ्र आम्हा सोयरे वनचरे

नर्मदाकाठी प्रवास करीत असतानाच एकदा असे झाले की, प्रातःस्नानासाठी नर्मदेवर गेले असता वाघाची डरकाळी ऐकू आली. एक क्षणभर दचकायला झाले. किंचित् भीतीही वाटली. पण दृढ निर्धाराने तसेच पाण्यात उतरून स्नान केले. सुसरी, मगरी तर अनेक वेळा समोर दिसत. पण देहाचे प्रारब्ध जर वाघाचे किंवा मगरीचे भक्ष्य होण्याचे असेल तर तसेच होणार, तसे नसेल तर ते कशाला या देहाच्या वाटेस जातील असे मनात चिंतून आपल्या नित्य प्रातःस्नानाच्या नियमात खंड पडू दिला नाही.

या काळातच खेडीघाट, नर्मदातीरी ओंकारेश्वर, उज्जैन, अजमेर, पुष्कर इत्यादि तीर्थक्षेत्रास भेटी दिल्या. अशा रीतीने केवळ फराळावर राहून, घोर अरण्यात वास्तव्य करूनही एकांतसाधना श्रींनी केली. हरिभजनाशिवाय दुसरा व्यवसाय नव्हता. सर्व वेळ जप, नामस्मरण, ध्यानधारणा यात जाई.

एकदा पहाटेस जपास प्रारंभ करणार, तो डोक्याजवळील खुंटीवर अस्सल नाग दिसला तरी श्रींचे लक्ष तिकडे गेले नाही. आणि नेहमीप्रमाणे एकाग्रतेने श्रींनी जप केला. नाग श्रींच्याकडे फिरकलासुद्धा नाही. धर्माचरण अत्यंत उत्कटतेने झाले की वैराग्य आपोआप येते असे संत सांगतात. श्रींचे उदाहरण आमच्या डोळ्यांसमोर आहेच. याप्रमाणे सर्वत्र प्रवास करून अजमेरहून आषाढ शुद्ध ११ शके १८६० मध्ये भीमातीरी खेड येथे आगमन झाले.

## गायत्री पुरश्चरण

खेडच्या केदारेश्वर मंदिरातील मठात वास्तव्य व्हावे असा ईश्वरी संकेत होता. येथे श्रींचे मन रमले व तेथे राहून २४ लक्षात्मक गायत्री पुरश्चरण अयाचित वृत्तीने पूर्ण करावे अशी वृत्ती उठली, व त्याप्रमाणे सर्व तयारी करून यंत्रपूजेसह नित्य गायत्रीच्या जपानुष्ठानास प्रारंभ झाला. १९४१ साली आरंभलेले हे पुरश्चरण २१ महिन्याने १९४२ मध्ये पूर्ण झाले.

या काळात सतत नंदादीपही ठेवला होता. एकदा रात्री झोप लागली असता कुणी तरी 'अरे, उठ, दिव्यात तेल घाल' असे म्हटल्याने एकदम

जाग आली, तर खरोखरच दिव्यातील तेल संपत आले होते. पटकन हातपाय धुऊन तेल घातले. अशा रीतीने अगदी यथासांग हे अनुष्ठान पूर्ण झाले.

## प्रवचनसेवेचा आनंद

फेब्रुवारी १९३७ मध्ये नोकरी सोडल्यापासून साधारणपणे जेथे जेथे मुक्काम होई तेथील देवळात तुळशीरामायणावर प्रवचने होत असत. अगदी प्रथम संपूर्ण रामायणावर प्रवचने करण्यास ५ महिने लागले होते, पण उत्तरोत्तर हा काळ वाढतच चालला. कारण रामायणाचे जितके सखोल परिशीलन होऊ लागले तितके त्यातून अधिक अर्थ, अधिक भाव निघू लागले व मग जास्त जास्त वेळ लागू लागला. स्वतः नित्य रामायणाचे वाचन तर अखंड चालूच होते. खेड येथे केदारेश्वर मठात नऊ महिन्यात केवळ बालकांड सांगून झाले. जेथे सहज योग येईल तेथे श्रीमानसाचा प्रसार करणे ही गुरुदक्षिणा बाबा गंगादासांनी मागितली होती, त्यामुळे किरकोळ प्रवचनेही जेथे जातील त्या ठिकाणी सुरूच असत.

## सौभाग्यवतीची अनुज्ञा

गायत्री पुरश्चरणाची सांगता झाल्यावर श्रींनी चतुर्थाश्रम घेण्याचे ठरविले. अर्थात् यासाठी पत्नीची संमती हवी. तेव्हा सौ. कमलाबाई कर्वे यांना पत्र गेले की, चतुर्थाश्रम घेण्याचा विचार आहे. त्यास तुमची संमती हवी. अन्यथा अग्निहोत्र ठेवून वानप्रस्थाश्रम स्वीकारून राहता येईल हे मान्य असेल तर हे पत्र पोहोचल्यापासून १५ दिवसाचे आत तुम्ही खेड येथे येऊन हजर व्हावे. याप्रमाणे १५ दिवस वाट पाहिली जाईल. तसे न झाल्यास चतुर्थाश्रम स्वीकारण्यास तुमची संमती आहे असे गृहीत धरून चतुर्थाश्रम स्वीकारला जाईल यावर काहीच पत्रोत्तर न आल्याने चतुर्थाश्रम स्वीकारण्याचे निश्चित ठरले व त्याप्रमाणे सर्व व्यवस्था करू लागले.

## संन्यास म्हणजे कायद्याच्या दृष्टीने मरणच !

संन्यास म्हणजे एक प्रकारे कायद्याच्या दृष्टीने मृत्यूच *(Legal death)*असतो. त्यात आपणच आपले श्राद्ध करावयाचे असते असे म्हणतात. त्यावेळी खेड येथे मॅजिस्ट्रेटपुढे, आपण संन्यास घेत असून तो एक प्रकारे आपला कायदेशीर मृत्यूच होय असा कबुलीजबाब लिहून दिलेला श्रींच्या कागदपत्रात आढळून आला. यानंतर पूर्वाश्रमीच्या स्थावर जंगम कुठल्याही वस्तूबद्दल कुठलाही अधिकार (हक्क) वा कर्तव्य शेष राहात

नाही.

चिंचणी-तारापूर १९३७ मध्ये सोडल्यापासूनच सौ. कमलाबाई कर्वे, जवळ जवळ आपल्या बंधूंच्याकडे चौक येथे राहात होत्या. आणि त्यांच्या हयातीपर्यंत त्यांना उत्पन्न मिळेल अशी जमीन त्यांचे नावे करून त्यांच्या उदरनिर्वाहाची व्यवस्था लावली होती. याबद्दल त्या कुणावर अवलंबून नव्हत्या. श्रींनी संन्यास घेतला त्यावेळी आई-वडील कुणी हयात नव्हतेच. मुलगेही दोन झाले व गेले. पत्नीची याप्रमाणे व्यवस्था केली व सासुसासरे निवर्तल्यावरच संन्यास घेतला. यामागे वृद्ध माता पिता यांना दुःख होऊ नये हाच हेतू दिसून येतो. याप्रमाणे सर्व निरवानिरव करून खेड येथेच ता. १८-१-४३ ला, टिळक पंचांगाप्रमाणे पौष शुद्ध द्वादशीस, त्यांच्या कुंडलीप्रमाणे स्थिरलग्नी स्थिरनवांशात चतुर्थाश्रमाचा स्वीकार केला.

## अंतरीच्या वृत्ती उफाळून आल्या

सन १९४० च्या जुलैपासूनच खेड, जिल्हा पुणे येथे श्री केदारेश्वराच्या मागील मठात निवास असतानाच आळे येथील श्री वासुदेवानंद सरस्वती (पोटे) स्वामीमहाराज यांच्याबद्दलची परस्परविरुद्ध अशी पुष्कळ माहिती श्रींना कळली होती. पैसे, दागदागिने, जिन्नस वगैरे मागतात, घेतात, संग्रह करतात इत्यादी सर्व विक्षिप्त वृत्तींची हकिकत कळली होती. पैसे घेणाऱ्या आणि संग्रह करणाऱ्या संन्याशाचे मुखावलोकन करू नये असे पूर्वाश्रमात श्रींना वाटत असे. हे सर्व माहित असून दिवसेंदिवस अंतरातून श्रींना अशी स्फूर्ती होऊ लागली की ते श्रोत्रिय ब्रह्मविद् वरिष्ठ आहेत; व पूर्ण समाधान होण्यास त्यांच्या चरणावर शिष्यभावाने डोके ठेवणे जरूर आहे. ही अंतरीची वृत्ती, स्फूर्ती *(Inner voice)* बळावत गेली व १८-१-४३ ला खेडला चतुर्थाश्रम स्वीकारल्यानंतर दंडग्रहण करण्यासाठी श्रींनी श्री वासुदेवानंद सरस्वती (पोटे स्वामी) यांचेकडेच जाण्याचे ठरविले.

श्री. प. पू. आळ्याच्या महाराजांशी परिचय असलेला माणूस श्रींच्या बरोबर होता. त्याने मोटारचे तिकीट काढून दिले. पण मोटारीत एकच जागा रिकामी होती. त्यांमुळे त्यास बरोबर येता आले नाही. २/३ तासांनी मागल्या मोटारीने त्याचे येण्याचे ठरले व श्रींनी मात्र त्या मोटारीने आळ्यास प्रयाण केले.

तो धन्य दिवस माघ शुद्ध दशमी, रविवार शके १८६४ हा ! दुपारी १२।। च्या सुमारास आळे येथे आमच्या श्रीपरमगुरूंच्या निवासस्थानी ते जाऊन पोहोचले. यथाविधी दर्शनार्थ माडीवर गेले. आळ्याच्या श्री

महाराजांचे ते प्रसन्न मुख व ब्रम्हतेज पाहूनच श्रींना परमानंद झाला व धन्यता वाटली. पण त्यावेळी महाराज भिक्षाग्रहण करीत होते. (जेवत होते.) त्यामुळे वंदन न करताच श्री स्वस्थ उभे राहिले. पूर्वसूचना किंवा पत्र काहीच पाठविले नसून आळ्याच्या श्रीमहाराजांनी श्रींना पूर्वाश्रमीच्या आडनावाने संबोधून संस्कृतमध्येच कुशल वगैरे विचारले. वास्तविक महाराज कधी कोणाजवळ संस्कृत बोलताना आढळत नसत! पण श्रींच्या बाबतीतच हे आश्चर्य घडले. एकमेकांस जणू एकमेकांची खूण पटली.

## योगपट्ट विधीचा सोहळा

श्री आळ्याच्या महाराजांचे भोजन झाल्यावर यथाविधी वंदन केले. यावेळीच

यद्‌पाद पंकज पराग पवित्र मौलि-
भूँयो न पश्यति नरो जठरं जनन्या ।
तं वासुदेवमजमीशमनन्तबोधं,
श्रीमद्‌गुरूं शरणदं शरणं प्रपद्ये ।।

हा श्लोक म्हणून साष्टांग वंदन केले. या वेळीं या गुरूशिष्यांच्या हृदयात अनिर्वाच्य सुखाचे जे कल्लोळ उसळले असतील त्याचे वर्णन कोण करू शकेल! यानंतर त्याच दिवशी सायंकाळपर्यंत **योगपट्ट विधीही** उरकला. या प्रसंगाचे वर्णन श्रींनी पुढीलप्रमाणे करून ठेवले आहे,

माघ शुद्ध दशमी मृग भानुवार । केला अंगीकार वासुदेवे ।
(सन १९४३, आळे मुक्काम, तालुका जुन्नर, जिल्हा पुणे)
योगपट्टदीक्षा देऊनी दासासी, गुरूपरंपरा त्यासी सांगितली।
**वासुदेवानंद, त्रिविक्रमानंद, नृसिंहानंद, वासुदेवानंद।**
यतिसंप्रदाय सरस्वतीनामें । प्रज्ञानानंद अभिधान ।।
दूधाहारी मठ, भोसल्यांचा घाट । वाराणसी क्षेत्र पुण्यभूमी ।
महावाक्य पंचीकरण तत्वबोध । करूनिया गुज निरोपिले ।।
शिरी पद्महस्त ठेवुनिया मम । मज आप्तकाम गुरुने केले ।
तेव्हां कृतकृत्य झालो याच देहीं । ठेवूनियां शिर गुरुपायीं ।।
अजन्म्याचा आता जन्मची चुकला । सनातना प्राप्ति अमरत्व ।
जगामाजीं अतां माझा मी भरलो । मजमाजीं सर्व जग तैसें ।।
मजहूनि आता जग भिन्न नसे । जें जें दिसे भासे गुरुरूप ।।
(माघ शुद्ध दशमी शके १८६४)

## प्रज्ञावासुदेव अमर झाले

याप्रमाणे हा मणिकांचन योग जुळुन आला. श्रीसद्गुरु कितीही थोर असले तरी त्या योग्यतेचा शिष्य नसेल तर त्यांचे गुरुत्वास मोल चढत नाही. निवृत्तीदासांचे ज्ञानेश्वरांमुळे, जनार्दनांचे एकनाथांमुळे, रामकृष्णांचे विवेकानंदांमुळे, समर्थांचे कल्याणस्वामीच्यामुळे गुरुत्व सार्थ ठरले. या सर्व अलौकिक गुरुशिष्य जोड्यांप्रमाणे श्री वासुदेवानंदांचे नावाचा जयजयकार करून श्री प्रज्ञानानंद सरस्वती स्वामीमहाराजांनी त्यांचा कीर्तिध्वज आभाळात उंच फडकविला. 'प्रज्ञावासुदेव' हे नाव अजरामर झाले. नाहीतर भारतात ब्रम्हनिष्ठ, अत्यंत श्रेष्ठ अशा पुरुषांची उणीव नाही. पण त्याच तोडीचे शिष्य मिळाले म्हणजे त्या शिष्यांच्यामुळे श्री गुरुंनाही अधिक कृतार्थता प्राप्त होते. त्यांचे नाव त्रिभुवनात दुमदुमू लागते.

## तुमचे गुरुबंधू तुम्हीच

केवळ संकल्पाने शक्तिपात करण्याची अद्‌भूत शक्ति श्री महाराजांच्या ठिकाणी होती हे श्रींच्या तात्काळ पूर्णपणे अनुभवास आले. आणखी एक विचित्र प्रकार असा घडला की, नामकरणाच्या वेळी श्रींनी महाराजांना त्रिवार विनंती केली की रामानंद किंवा राघवानंद नाम ठेवल्यास अनायासे रामस्मरण होईल. पण श्री महाराजांनी निक्षून सांगितले की 'प्रज्ञानानंद ठेवावयाचे आहे' व तेच ठेवले गेले. याचा परिणाम म्हणजे सन १९४३ नंतरचे लेखन ! आधी जे काही काव्य लिहिले गेले त्याच्याशी नंतर झालेल्या लेखनाची तुलना केली तर खरोखरच तोंडात बोट घालण्याजोगा फरक आढळून येतो. यावरून श्री आळ्याच्या महाराजांनी त्या नावाबरोबर आपले सर्वस्व या दीन दासास दिले असे उत्तरोत्तर प्रचीतीस येऊ लागले, असे श्री म्हणत असत ते किती सार्थ आहे त्याची प्रचीती येते.

श्रींनी एकदा महाराजांना 'प्रज्ञानानंदाचे दुसरे गुरुबंधू कोण, कुठे आहेत' असे विचारले असता, 'तुमचे दण्डी गुरुबंधु तुम्हीच, नुसते आश्रमी पुष्कळ झाले, त्यांच्याशी काय कर्तव्य!' असे उद्‌गार काढले.

## गुरुशिष्यांचा थोर अधिकार

आळ्याच्या श्रीमहाराजांना १९४३ च्या पूर्वीच अर्धांगाचा झटका येऊन डावे अंग निरुपयोगी झाले होते. मधुमेहाचा विकार तीव्र होता. त्यामुळे सदा अवधूत स्थितीतच राहत असत. उठणे, बसणे, कौपीन नेसणे इत्यादि

काही करता येत नसे. शौचादि क्रियाही बसल्या जागीच आसनावर होत असत. परातीत उचलून ठेवून स्नान घालावे लागत असे. मांड्या वगैरे भागांवर अनेकवेळा तळहाताएवढी फाफरे पडत, त्यांना मुंग्या डसत, पण हूँ की चूं नाही. महाराजांच्या देहास होणारे कष्ट श्रींना पाहवेनात, तेव्हा श्रींनी एकदा विनंती केली की 'आपले सर्व रोग व पीडा या आपल्या दासास देऊन, पुष्कळ वर्षे भोगीत असलेल्या या असह्य कष्टांतून मोकळे व्हावे. आपल्या कृपेने या स्वामीच्या देहास ती उपाधि फार काळ बाळगावी लागणार नाही.' यावर उत्तर मिळाले की, 'मी देऊ शकेन व तुम्ही घेऊ शकाल, हे अगदी खरे, पण ज्याने केले त्यानेच भोगणे योग्य, फार त्रास होतो असे मनाला वाटले की प्राण ब्रम्हरंध्रात चढविताच कष्ट मुळीच नाहीत.' या वाक्याने श्रींना कळले की सद्गुरुमहाराजांनी योगाभ्यास उत्तम केला असला पाहिजे. या गोष्टीवरून गुरुशिष्य दोघांचाही श्रेष्ठ अधिकार व एकमेकांबद्दलची अत्युत्कट प्रीती या दोहींची कल्पना येते! धन्य ते परमगुरु व धन्य त्यांचा तो एकुलता एक लडिवाळ शिष्य !

# ५. पुणे जिल्ह्यातील वास्तव्य

शके १८६४ मध्ये श्रींनी पौषात चतुर्थाश्रम स्वीकारला. म्हणजे इ. सनाप्रमाणे १९४३ च्या जानेवारीत. पुढे फेब्रुवारींत १२/२/४३ ला दंडग्रहणविधी पार पडला. यावेळीही श्रींचा मुक्काम केदारेश्वराच्या मठातच होता.

त्या वर्षीचा चातुर्मास खेडला मठातच झाला. नित्य रामायणावर प्रवचने चालूच असत. याचवेळी सामुदायिक सत्यनारायणाचे अनुष्ठान तेथील लोकांकडून करवून घेण्याचे श्रींच्या मनात आले. मठाधिपती वगैरे काही मंडळी म्हणाली की, बाजारात साखर, गहू, रवा मिळत नाही व एक महिना असले अनुष्ठान होणे शक्य नाही. पण एकंदर ८० सत्यनारायण झाले. त्यात सर्व थरातील लोकांनी भाग घेतला होता. समाप्तीला भंडाराही झाला.

## आदिशक्तीचे साक्षात् दर्शन

खेडला मठात राहात असतानाच तेथे नवीन बांधलेल्या गुहेत ध्यानास बसल्यावर, सहज इच्छा नसता, हृदयांत आणि बाहेर श्री आदिशक्तीचे जे

दर्शन श्रींना झाले, (जून-जुलै १९४४) त्याचे वर्णन श्रींनी पुढील प्रमाणे करून ठेवले आहे.

वृषस्कंधारूढां परमरुचिरां सस्मितमुखीं।
त्रिशूलाढ्यां पद्माभयवरकरां नित्यसुखदाम्।।
सुवर्णाभां दुर्गां दुरितहरिणीं रक्तवसनां।
नमाम्यन्तर्बाह्ये नयनविषयां विश्वजननीम्।।१।।

येथे मुक्काम असतानाच एकदा ऋद्धि सिद्धी स्त्री-रूपात दर्शनास आल्या. श्रींनी विचारले 'कोण आहे? काय पाहिजे?' तेव्हा उत्तर आले, 'आम्ही ऋद्धिसिद्धी आहोत, आम्हांला सेवेला ठेवून घ्या.' तेव्हा श्रींनी उत्तर दिले, 'ऋद्धिसिद्धी आमच्या वाटमाऱ्या आहेत, तरी कृपा करून येथूनं निघून जा.' तेव्हा त्यांनी उत्तर दिले की, एका उत्तर हिन्दुस्तानी साधूची जशी न दिसता सेवा केली तशी न दिसता सेवा करू. निदान आमच्या कल्याणासाठी तरी आम्हास सेवा करू द्या. पण श्रींनी या गोष्टीस ठाम नकार दिला व श्रीरामरायाची प्रार्थना करून या उपाधी मागे लावू नयेत अशी विनंती केली.

## श्री गुरुगीता प्रबोधिनीचा जन्म

येथील मुक्कामातच कार्तिक शु. ४ व ५ शके १८६५ या दोन दिवसांत 'श्रीगुरुगीता प्रबोधिनी' ही स्कंदपुराणातील गुरुगीतेवरील प्राकृत टीका लिहिली गेली व ती श्री आळ्याचे महाराजांना समर्पित केली गेली. या वर्षांच्या अखेरीस श्रींनी खेड सोडून चासकमान येथे आपला मुक्काम हलविला.

## प्रभूपद अंकित भूमी

यानंतर श्रींचे वास्तव्य, खेड तालुक्यातील चासकमान या गावी दीर्घकाळ झाले. तेथे विठ्ठलमंदिर होते व त्यास लागून स्वतंत्र मठ होता. तेथे श्री राहात असत. चास-कमानला नदीकाठी श्री हटकेश्वराचे मंदिर असून, भीमेला सुंदर घाट बांधलेला आहे. १९५२/५३ पर्यंत तरी स्थान रम्य होते. आता कदाचित् पडझड झाली असेल.

चास-कमानला पूर्वी श्री आळ्याचे महाराजही बरेच वर्षे होते. त्यावेळी लोक त्यांना गारगोटे स्वामी म्हणत असत. ही भूमी (गुरु) प्रभूपदअंकित असल्यानेच कदाचित् श्रींनी वास्तव्यासाठी हिची निवड केली असेल.

## हरिभट्ट शिष्यभावाने आला ...

१९४५ साल होते. मार्च महिना सुरू झाला होता. उन्हाळयाची सुरुवात होती. एक दिवस एक कानडी आप्पा श्रींच्या परिचित अशा एका सज्जनाची चिठ्ठी घेऊन चासला येऊन ठेपला. जवळ लोटा, भांडे, सोवळे, पांघरुण वगैरे काहीच नाही. श्रींच्या पुढे येऊन प्रणाम करून 'हरिभट्ट' म्हणून नाव सांगितले. 'कुठले राहणार?' विचारता, सागर, जिल्हा शिमोगा म्हणून उत्तर दिले. वय केवळ १९ वर्षांचे! परमार्थाची आवड म्हणजे एक आश्चर्यच होते! त्यास ता. २२/३/१९४५ रोजी मंत्रपूर्णाभिषेक दीक्षा श्रींनी दिली. चासला मठातच राहिला होता. श्रींच्या सतत सान्निध्यामुळे योगमार्गात त्याची भराभर प्रगती होऊ लागली. एप्रिलची ९ तारीख, श्रींचे समोरच हरिभट्ट अभ्यासास बसे. त्या दिवशी त्याची निर्विकल्प समाधी लागली. शिष्याची प्रगती पाहून श्रीगुरुंना आनंद वाटला. त्यांनी त्याच्यावर अधिकच कृपावर्षाव केला. त्यानंतर आठ दिवसात परत २-२।। तास तो निर्विकल्पात गेला होता.

जूनपर्यंत तो चासलाच होता. मराठी त्याला चांगले बोलता येऊ लागले होते. पण या वास्तव्यातच त्याची आचारहीनता, आलस्य, सिद्धींची लालसा, जिव्हालौल्य इत्यादि दुर्गुण श्रींच्या नजरेस आले. मुमुक्षुत्व जराही नव्हते. वागण्यात शिस्त नव्हती. आळस पुरेपुर होता. व सर्वांत वाईट गोष्ट म्हणजे दुर्जनांची संगत त्यास फार प्रिय होती! हे सर्व पाहिल्यावर श्रींनी त्यास पैसा न घेण्याची व ज्योतिष सामुद्रिक पाहिल्यास ब्रह्महत्येच्या पातकाची शपथ घ्यावयास लावली व शुक्रवार २५ जून १९४५ यादिवशी पायी यात्रेसाठी म्हणून चासहून निरोप दिला.

## ... गुरूद्रोही म्हणून मेला

यानंतर श्रींच्या असे दृष्टोत्पत्तीस आले की तो तीर्थयात्रेस न जाता जुन्नर येथेच राहिला असून आपणांस शरण येण्यापूर्वीच जारण मारणादि शिकला होता. तेव्हा मार्गशीर्षात त्यास जुन्नर येथे परत बजावले की 'जुन्नर सोडून पूर्वसंकल्पाप्रमाणे तीर्थयात्रेस जा, नाहीतर येथे कल्याण दिसत नाही!' पण सर्वप्रकारे अनाचारी असल्याने त्याने प्रत्यक्ष श्रीसद्‌गुरुवरच मारणाचा प्रयोग केला.

त्यावेळी चास-कमानलाच श्रींचा मुक्काम होता. एकाएकी रक्ताचे जुलाब होऊ लागले व प्रकृती गंभीर झाली. त्यावेळी श्रींनी मूठभर तुळशीचा पाला वाटला व त्याचा रस फक्त सेवन केला व काही मंत्रोच्चार केला. इतकी

अवस्था होती तरी नित्यनियमांत खंड पडत नव्हता. पण शेवटी झाले असे की, प्रत्यक्ष ब्रम्हनिष्ठ अशा श्रीगुरुंचेवर केलेला मारणाचा प्रयोग त्या हरिभट्टावरच उलटला व तो फाल्गुन वद्य ११ ला मढ, तालुका जुन्नर येथे मरण पावला! त्याची क्रियाही कोणी केली नाही! श्रींनी हे सर्व ऐकल्यावर 'अस्तु! भगवदिच्छा!' असे उद्‌गार काढले.

या सर्व हकिगतीवरून खरोखरच साधकांनी धडा घेण्यासारखा आहे. कारण एकीकडे योगमार्गात प्रगती होऊन प्रत्यक्ष निर्विकल्पापर्यंत पोहोचलेल्या साधकाची ही स्थिती! ज्यांच्यामुळे आपणास हा लाभ झाला त्यांच्याबद्दल कृतज्ञता तर राहोच, पण त्यांनी केलेला हितोपदेशही त्यास रुचला नाही. एवढेच नव्हे तर त्यांच्यावरच मारणाचा प्रयोग करण्यापर्यंत ज्याची मानसिक अधोगती झाली, त्यास यापेक्षा कुठली गती मिळणार? म्हणजे योगमार्गांतील दिव्यानुभवापेक्षा आपली मानसिक उन्नती वा अवनती यास किती महत्त्व आहे हे लक्षात येईल.

## आमुची चिंता रघुरायाला

असो. याप्रमाणे फाल्गुनात (१९४५ मार्च असावा) याप्रमाणे या शिष्यामुळे श्रींना हे सर्व क्लेश सोसावे लागले. तब्येत जरा सुधारली न सुधारली तोच चैत्रात पुन्हा मुदतीचा ताप आला. यावेळी तर नाडीही लागेना अशी अवस्था एकवेळ आली होती. अर्थात् तरी पूर्ण शुद्धीवर होते व 'रामास आमची सर्व चिंता आहे. तुम्ही काळजी करू नका किंवा कुणाला सेवेसाठीही बोलवू नका. स्वस्थ पडू द्या, फार तर प्यायला पाणी तेवढे द्या.' असे सांगितले.

खरेतर समाधीचीच वेळ आली होती. पण अद्याप श्री बाबागंगादासांचा आशीर्वाद खरा व्हावयाचा होता; म्हणूनच की काय श्रींना बरे वाटले. मध्यंतरी दोन तीन महिने गेले, तोवर श्रींची तब्येतही पूर्ववत् उत्तम झाली.

## अनिवार काव्यस्फूर्ती

श्रावण महिना लागला आणि श्रींना अनिवार काव्यस्फूर्ती होऊ लागली. 'सांगतसे मज तो रघुराणा । मम आज्ञा ऐके प्रज्ञाना । (१०-८-४५) सत्वर करण्या घे तूं हातीं। रामचरित मानस रचना ती ।।१।।' अशी श्रीरामाची आज्ञाच झाल्याने श्रावण शुद्ध द्वितीया शके १८६७ (गुरुवार ता. १०-८-४५) श्रीरामचरित मानसाचा (दोहा, चौपाया, सोरठा, छंद इत्यादी मूळाप्रमाणे तंतोतंत) समवृत्त-समच्छंद अनुवाद

लिहिण्यास श्रींनी सुरुवात केली. आणि काय आश्चर्य, अवघ्या तीन महिन्यांत (खरे तर २/३ दिवस कमीच) संपूर्ण श्रीरामचरितमानसाचा अनुवाद लिहून झाला. श्रीरामचरितमानस ग्रंथ विस्ताराने वास्तविक श्री ज्ञानेश्वरी एवढा आहे. आणि हा अनुवाद केवळ तीन महिन्यांत (मानसांत सुमारे दहाहजार चौपाया आहेत.) लिहिला जावा हा खरोखर आजच्या युगातील एक महान चमत्कार म्हटला पाहिजे. तो अनुवादही फारच सरस उतरला आहे. शिवाय, मुळातील गोडी कायम आहेच. कोणीही दोन्हीची तुलना करून खात्री करून घ्यावी. श्रींच्या मते हे सर्व श्री बाबा गंगादासांच्या आशीर्वादाचे व श्री आळ्याच्या महाराजांच्या कृपेचे फळ होते! 'तुलसीदासजीं तेरे मुखसे बोलेंगे' हा बाबांचा आशीर्वादच फलद्रुप झाला. श्रींनी म्हटल्याप्रमाणे 'प्रज्ञा लिही यन्त्रसा' हेच खरे! कारण कुणीही विचार करून हा अनुवाद करावयाचा प्रयत्न केला असता तरी इतक्या अल्प मुदतीत हे कार्य झाले असते की नाही हे सांगणे कठीण! हे तीन महिने कसे भारल्यासारखे गेले असतील व श्रींचे विषयाशी किती तादात्म्य झाले असेल हे अनुवाद वाचल्यानंतर जाणवते! धन्य ते संत, की ज्यांच्या केवळ आशीर्वादाने अशी महान कार्ये केवळ चुटकीसरशी होतात!

## गुरुचरणी अनुवादमानस अर्पण

लगेच श्री आळ्याच्या महाराजांना पत्र लिहून याप्रमाणे अनुवाद लिहून झाल्याचे कळविले व दर्शनाविषयी अनुज्ञा मागितली. ता. ६/११/४५ व ७/११/४५ या दोन दिवसांत श्रीरामाची, बाबा गंगादासांची व श्रीरामायणाची वगैरे विविध आरत्या तयार झाल्या व तोपर्यंत श्रींची अनुज्ञा मिळाल्याने ता. ८/११/४५ ला रामायण घेऊन आळ्यास श्रीमहाराजांचे दर्शनास श्रींचे जाणे झाले.

श्रींनी श्री आळ्याच्या महाराजांना मराठी रामचरितमानस (हस्तलिखित) वाचून दाखविण्यास सुरुवात केली. ते जसजसे वाचू लागले, तसतसे श्री आळ्याच्या महाराजांच्या नेत्रांतून अश्रुधारा वाहू लागल्या. काही ठिकाणी तर ते अगदी हुंदके देऊन ओक्साबोक्शी रडूच लागले. इकडे श्रींचीही वाचताना कंठ भरून येऊन, डोळ्यांतून अश्रुधारा अशी कठीण अवस्था होऊ लागली. शेवटी अशा रीतीने मधूनच थांबत, तो अनुवाद श्री महाराजांना अधून मधून वाचून दाखविला व त्यांचा अभिप्राय व आशीर्वाद मागितला. तेव्हा असा असा लिहून आणा म्हणून आज्ञा झाली व त्याप्रमाणे लिहून नेल्यावर श्री आळ्याच्या महाराजांनी खाली सही केली. तो अभिप्राय आणि आशीर्वाद असा-

धन्योऽसि कृतकृत्योऽसि पावितं स्वकुलं त्वया।
अन्तः संतोषमापन्ना श्रुत्वा रामायणं वयम् ।।१।।
साकी : तुलसीदासकृत - काव्य कुसुमगत् मधुप : प्रज्ञानोऽयम् ।
रामचरित मधु निजभाषायामर्पितवानस्मभ्यः ।।२।।
इदं रामायणं काव्यं जनानां सौख्यदायकम् ।
प्रीतिपात्रं भवेल्लोके शाश्वतं कीर्तिवर्धनम् ।।३।।
भुक्तिं भक्तिं च कैवल्यं ज्ञानं वैराग्यमेव च ।
सेवनादचिरान्नित्यं दास्यत्येष वरो मम ।।४।।

प्रत्यक्ष श्रीगुरुंनी 'धन्योऽसि कृतकृत्योऽसि पावितं स्वकुलं त्वया' असे ज्यांच्याबद्दल म्हटले, त्यांचे भाग्य व थोरवी शब्दात वर्णन करणे कुणाला तरी जमेल का? खुल्या दिलाने शिष्याची अशी भलावण करणारे असे श्री सद्गुरुही विरळाच; आणि प्रत्यक्ष श्रीगुरूंनी नावाजले असताही ज्यांना अहंकाराचा स्पर्शही झाला नाही असे श्रींच्या सारखे शिष्यही विरळा!

## चले जाव आंदोलन

याप्रमाणे बघता बघता १९४५ साल संपले व १९४६ साल उजाडले. यावेळी भारत स्वतंत्र झालेला नव्हता. 'चले जाव' आंदोलन सुरूच होते. त्यातच हैद्राबादमध्ये रझाकारांनी अनन्वित अत्याचार सुरू केल्याच्या बातम्या सारख्या कानावर येऊन थडकू लागल्या. संन्यास घेण्यापूर्वी श्रींनी रामदासी संप्रदाय स्वीकारला होता व त्यांच्यावर श्रीसमर्थांचा व त्यांच्या वाङ्मयाचा फार खोल परिणाम झालेला होता. ते संस्कार यावेळी बळावून 'अहो हिंदूंनो, संघ संपन्न—व्हावे.' 'हिंदूंनो डोळे उघडा' 'दूर करी शीघ्र जाच हा,' 'श्रीसमर्थ प्रार्थनाष्टक' यासारखी काव्ये निर्माण झाली. यातील काही तत्कालीन 'केसरी' सारख्या वृत्तपत्रातून प्रसिद्धही झाली.

## गुरुदर्शनाची ओढ

याकाळात श्रींचे वास्तव्य जरी मुख्यतः चासकमान येथे होते, तरी मनात जर श्रीगुरुमहाराजांच्या दर्शनाची इच्छा उद्भवली तर पहाटेच कुणालाही न विचारता नित्यक्रम आवरला की चंबू गबाळें उचलून सरळ आळ्याच्या दिशेने चालू लागत. संन्यास घेतल्यापासून पैशाला स्पर्श करीत नसल्याने पैसे कधीच जवळ बाळगीत नसत. मग एस.टी. चे तिकीट तरी कसे काढणार? कुणाजवळ याचना करणे तर मुळीच ठाऊक नव्हते. त्यामुळे

सरळ उठून पायी चालू लागत. अशावेळी रोजच्या नियमाप्रमाणे प्रातः काळी त्यांचे एक 'शिष्य' श्री. बाबूशेठ दर्शनासाठी मठात येत नि पाहावे तो श्रींचा पत्ता नसे; कुणालाच काही माहीत नसे. मग काय बाबूशेठही तडक खेडच्या वाटेला चालू लागत. त्यांचे त्यावेळी तरुण वय पण श्रींची चाल अशी वेगाची असे की त्यांना गाठायचे म्हणजे श्री. बाबूशेठना अक्षरशः पळावेच लागे. कसेबसे एकदा येऊन खेडपर्यंत श्रींना गाठत व मग श्रींचे व आपले तिकीट (एस.टी.चे) काढून त्यांच्या बरोबर आळ्यास, श्री आळ्याच्या महाराजांकडे दर्शनास जात व परत त्यांना घेऊनच मग चासकमानला येत. गाठ पडल्यावर विचारले की 'एकाएकी का निघून आलात? आमचे कुणाचे काही चुकले का? तसे असेल तर सांगावे!' त्यावर श्रींचे उत्तर येई, 'छे! तसे काही नाही! मनात आले श्रीगुरुंच्या दर्शनास जावे म्हणून निघालो झाले!' याप्रमाणे अनेक वेळा घडे.

## विपुल काव्य लेखन

एकदा आळे येथे गेले असतानाच, कीर्तनासाठी उपयुक्त असे 'भार्गव-दर्प-विमर्दन' हे व 'हिराबाई' चे एक अशी दोन आख्याने लिहिली गेली. (२ ते ४ सप्टें. १९४६ व ७ सप्टेंबर १९४६)

याच वर्षी चास येथे 'श्री हनुमान-चालिसाचा' मराठी अनुवाद चौपायांतच झाला. श्रींचे वास्तव्य जेथे असे तेथे बहुतेक करून 'दासनवमी'चा उत्सव साजरा होत असे. चासच्या अशा उत्सवाचे वर्णन श्रींनी काव्यात केलेले आढळते. तसेच अकरा 'मनाचे श्लोक' त्यांनी हिंदीत अनुवादित केलेलेही आढळून आले.

श्रींचे वास्तव्य बहुधा चास-कमानलाच होते. पण अधूनमधून नगर, बार्शी, कडूस इत्यादी ठिकाणांहून लोक दर्शनास येत असत. पण एकंदर श्रींची वृत्ती प्रसिद्धीपराङ्मुख असल्याने आपणहून कोणी शोध घेत दर्शनास आले तर, अन्यथा आपले नाव व्हावे अशा हेतूने चुकूनही एकादी गोष्ट त्यांचेकडून घडत नसे. शिवाय वृत्ती अत्यंत प्रेमळ पण निस्पृह, त्यामुळे 'निस्पृहस्य तृणं जगत्' अशी वागणुक असे. सत्यभाषणावर अत्यंत कटाक्ष. शिस्त व नियमितपणा यांची आवड. कुणी बेशिस्त वागले, थट्टेतही खोटे बोलले, आपला शब्द पाळला नाही तर निर्भीडपणे त्याची हजेरी घेतली जाई. त्यामुळे एक प्रकारचा दरारा सर्वांनाच वाटे. त्यांच्या समक्षच काय, पण माघारीही गैरवर्तन करण्याची शिष्यवर्गास हिंमतच होत नसे. असे असले तरी चूक झाली आणि प्रामाणिकपणे कबूल केली की लगेच क्षमा केली जाई. दांभिकतेची मात्र अत्यंत चीड असे.

## हा स्वामी तुमचा आहे

१९४६ मध्ये 'रझाकार चळवळी' च्या वार्ता ऐकून श्रींनी जे काव्य लिहिले होते, त्यांतील काही 'केसरी'त प्रसिद्ध झाले होते, ते वाचून श्री. ना. भा. जोशी *M.A.LL.B.*रा. कुंडल, संस्थान औंध यांचे लक्ष श्रींच्याकडे वेधले गेले. त्यांतही ते दासनवमी उत्सवानिमित्त गडावर गेले असता श्री. प. पू. श्रीधरस्वामींना आलेले श्रींचे पत्र त्यांच्या पाहण्यात आले. त्यामुळे हे कोण स्वामी आहेत, एकदा पहावे तरी अशी इच्छा, उत्कंठा त्यांच्या मनात उत्पन्न झाली. त्यांनी चौकशी केल्यावर त्यांना श्रींची माहिती कळली. तेव्हा ते व त्यांचा मुलगा चि. तात्या असे दोघे पुण्याहून सायकलवरून चासला श्रींच्या दर्शनास गेले. ही ह्या लाडक्या शिष्याची व श्रींची पहिली मुलाखत. श्री. ना. भा. जोशी यांच्या मनात ब्रम्हचर्याश्रम आणि वानप्रस्थाश्रम यांची सांगड घालून महाराष्ट्रात काही सामाजिक कार्य करावे अशी इच्छा अनेक वर्षे होती. श्रींचे काव्य पाहून या कार्यांत श्रींचा पाठिंबा मिळेल अशी अपेक्षा निर्माण झाली होती. श्री. जोशी, उभयता पितापुत्र चासला गेले तो दिवस ता. ४/४/४७ हा होता. दुपारी ११/१२ च्या सुमारास ते चासला पोहोचले व स्नान करून दर्शनास विठ्ठलमंदिरापलीकडील मठात गेले. दर्शन घेऊन सन्मुख बसल्यावर हळूहळू श्री. जोशी यांनी आपला मनोदय व आपली अपेक्षा बोलून दाखविली. त्यावर श्रींनी 'प्रत्येकाने आपापली उन्नती करून घ्यावी. समाजापुढे आदर्श निर्माण झाला की त्याचा फार उपयोग होतो. सर्व समाज सुधारणे ही गोष्ट सोपी नाही.' अशा प्रकारचे विचार व्यक्त केले. त्यानंतर बराच वेळ मनमोकळी चर्चा झाल्यावर शेवटी 'तुम्ही कोणतेही कार्य करा. हा स्वामी तुमचा आहे.' या शब्दात निःसंदिग्ध आश्वासन श्रींनी दिले तेव्हा श्री. जोशी यांना परम समाधान प्राप्त झाले.

## बालरूप रामचंद्र पूर्ण उगवला

१९४७ मधील एप्रिल महिना होता. १२ तारीख, म्हणजे कदाचित् रामनवरात्रातील एखादा दिवस असण्याची शक्यता आहे. रोजच्याप्रमाणे श्रींचे प्रातःस्नान वगैरे झाल्यावर ध्यानास बसले असता व श्रींचा धनुर्धारी रूपाचा अभ्यास असताही, त्या दिवशी अचानक बालरूपाचेच दर्शन झाले. श्रीराम, बालरूप, बसलेले, नीलवर्ण, दैदीप्यमान, स्मितहास्य, गालावर खूप लाली, कानात कुंडले, अंगात पिवळे झबले, कपाळावर पिवळा गोरोचन टिळक (उर्ध्व), हृदयावर झबल्यावर मौक्तिक मणिहार, मधून मधून कमरेची रत्नजडित मेखला दिसत होती. याप्रमाणे ता. १२ ला हेच रूप सारखे

दृष्टीसमोर येऊ लागले. या रूपाचे वर्णन करणारे काव्य 'बालरूप रामचंद्र पूर्ण उगवला' हे त्याचवेळी तयार झाले. ते १५/४/४७ रोजी वहीत लिहून ठेवलेले आढळले. तसेच ता. १५/४/४७ या दिवशी असेच मनात न आणताही अकल्पित श्री महालक्ष्मीचे, चतुर्भुज, कमलावर पद्मासन घातलेली, सुवर्णसदृशकांती, रक्तवस्त्र परिधान केलेली, वर अभय, खड्ग, शूल धारण केलेली असे दर्शन झाले. या महिन्यात श्रीरामस्तोत्र, भोजनविधि, संतासंत संगति, श्रीराम प्रातःस्मरण वगैरे स्फुट काव्ये अनेक निर्माण झाली. ता. २८/४/४७ ला अनेक नवीन वृत्ते श्रींनी केलेली, संकलित केली गेली. याप्रमाणे नित्य साहित्यसेवा चालूच होती.

## अनुष्ठान, राष्ट्रोन्नतीसाठी

पुढील वर्षी ना. भा. जोशी यांच्या आग्रहावरून श्रींचे कुंडलला वास्तव्य झाले. कुंडलजवळ वीराण्णाच्या डोंगरावर श्री ब्रम्हानंद महाराजांचे स्थान असून तेथे त्यांची ध्यानास बसण्याची गुहा, पाण्याची कुंडे वगैरे असून त्या डोंगरावरच श्रींचा निवास झाला. तेथे गिरीवर श्री ब्रम्हानंदाच्या आज्ञेने श्रींनी ३९ दिवसात १ कोटी ७५ लक्ष ६ हजार जप केला. श्री ब्रम्हानंदांनी राष्ट्रोन्नतीसाठी हे अनुष्ठान (१ कोटी प्रणवाचे) करावयास सांगितले होते. अनुष्ठान पूर्ण झाल्यावर श्रींना श्रीब्रम्हानंद महाराजांचे समाधिस्थितीत दर्शनही झाले. यानंतर परत श्रींनी चास-कमानकडे प्रयाण केले व त्यावर्षीचा चातुर्मास चास-कमानलाच झाला.

यानंतर श्री. ना.भा. जोशी व श्री सद्गुरु प्रज्ञानानंद सरस्वती स्वामी महाराज यांनी मराठवाड्यात निरनिराळ्या गावी संचार केला असावा असे दिसते. यातच फिरून परांड्यास श्रींचे येणे झाले. यासंबंधी असे कळते की, परांड्यास येण्याआधी श्रींची प्रकृती जरा बरी नव्हती म्हणून श्री. लक्ष्मणराव मुगावकर यांनी हवापालट म्हणून परांड्यास येण्याविषयी विनंती केली. इतक्यात तब्येत सुधारली म्हणून येण्याचे रद्द झाले. तो परत तब्येत बिघडली म्हणून परत येण्याचे ठरविले. तो परत तब्येत सुधारली. म्हणून श्रींनी सध्या येत नाही असे कळविले. तो फिरून तब्येत बिघडली म्हणून होकार कळविताच तब्येत सुधारली. यावरून ईश्वरी संकेतच परांड्यास जाण्याचा आहे असे समजून श्रींचे परांड्यास आगमन झाले. मळ्यात शंकराच्या देवळातच मुक्काम होता.

यावेळी रझाकार चळवळीचा जोर होता. गावात अशांत वातावरण होते. काही लोकांनी स्वसंरक्षणासाठी शस्त्रे पाजळून तयार ठेवली होती. त्यावेळी लोकांना धीर देण्यासाठी श्रींनी सांगितले होते की, 'जर रझाकारांचा

हल्ला झाला आणि स्त्रियांची बेअब्रू, विंटबना होण्याचा प्रसंग आला तर हा स्वामी संन्यासी असला तरी हातात तलवार घेऊन प्राणपणाने रझाकारांशी मुकाबला करून तुमचे संरक्षण करील.' येथेच जनताजनार्दनास सुख लागावे म्हणून श्रींनी मंत्रानुष्ठान काही काळ केले होते. ते झाल्याने वातावरण शांत झाले.

# ६. सांगली-सातारा जिल्ह्यातील वास्तव्य

आतापर्यंत श्रींनी मानसातील अनेक गूढार्थ लिहून ठेवलेले होते व अशा प्रकारची, मानसातील गूढार्थ प्रगट करणारी टीका 'मानसपीयूष' (अयोध्येहून) प्रसिद्ध झालेली श्रींच्या कानावर आली होती. पण चौकशी करूनही ही टीका मिळू शकली नाही. मात्र १९५० मध्ये 'मानसमणि' ह्या, रामचरितमानसावरील लेखनासच अग्रक्रम देणाऱ्या हिंदी मासिकाचा शोध लागला व त्याचे ग्राहक होण्याचा योग श्रींना आला.

याच वर्षी श्रींनी श्रीरामचरितमानसाची १०८ त्रिदिन पारायणे करण्याचे ठरवून त्याप्रमाणे पारायणास सुरुवात केली. साधारण पहाटे ६ ते ६।। ला वाचनास प्रारंभ होई आणि ११ ते ११।। पर्यंत वाचन पुरे होई. यावेळी प्रवास करावयाचा प्रसंग आलाच तरी त्या दिवशीचे वाचन संपल्यावर निघावे लागे व त्याच दिवशी रात्रीपर्यंत मुक्कामाचे स्थळ गाठावे लागे. या संकल्पाची पूर्ती ३१ ऑगस्ट १९५१ ला झाली.

यावेळी श्री. ना. भा. जोशी ह्यांनी दर्यापूर सोडले होते व ते इस्लामपूर येथे विद्यामंदिर हायस्कूलमध्ये शिक्षक म्हणून काम करीत होते. ते रुकडीकर यांच्या घरी भाड्याने राहात व श्री. हरी गोविंद अष्टेकर यांच्या अंगणात रोज रात्री गीता व रामायण यांवर प्रवचने करीत. त्यांच्या प्रवचनात श्रींचा उल्लेख वारंवार येई. यामुळे इस्लामपूर येथील मंडळींना श्रींच्या दर्शनाची उत्कंठा लागली होती. पण श्री. ना. भा. जोशी ह्यांचेकडूनच कळले की, श्रींची त्रिदिन पारायणे चालू असल्याने इतक्या दूरवरचा प्रवास ठराविक वेळेत व्हावयास हवा, तेव्हा काय करावे असा विचार सुरू झाला. यावेळी तेथील एक डॉक्टर श्री. बा. श्री. वैद्य यांनी त्यांची मोटार श्रींना आणण्यासाठी न्यावी अशी विनंती केली व ही व्यवस्था झाल्यावर श्री. ना. भा. जोशी ह्यांनी श्रींना कळविले. श्रींनी इस्लामपुरास येण्याचे मान्य केले.

३१ मार्च शनिवारी संध्याकाळी श्रींचे इस्लामपूर येथे प्रथम आगमन

सायंकाळी ५॥ वाजता झाले. त्यानंतर मात्र श्रींचा मुक्काम इस्लामपूर येथेच राहू लागला. त्यावेळी श्री. ना. भा. जोशी यांच्या घरी निवासाची व्यवस्था केली होती. सायंकाळी श्रींचे विठ्ठल मंदिरात प्रवचनही झाले व हा अपूर्व सोहळा समाप्त झाला.

नोव्हेंबर १९५१ मध्येच 'मानसपीयूष'ची द्वितीयावृत्ती निघत असल्याचे व बालकांडाचा प्रथम भागही प्रकाशित झाल्याचे कळले म्हणून श्रींनी श्री मानसपीयूषचे लागलीच ग्राहक होण्याविषयी संपादकांना पत्र लिहिले आणि त्या पत्राने संपादक इतके प्रभावित झाले की, त्यांचे पुढे १९५२ मध्ये श्रींना पत्र आले की परशुरामप्रसंगावर भाव लिहून पाठवावे. त्यावर श्रींनी आपणास व्याकरणशुद्ध हिंदी लिहिता येत नाही असे कळविल्यावरून त्यांनी कळविले होते की, आपण पत्रांत जी हिंदी भाषा लिहिता ती मला पसंत आहे. त्यामुळेच पुढे श्रींनी 'मानस गूढार्थ चंद्रिका' ही हिंदी टीका लिहावयास घेतली.

श्रींनी प्रथम हिंदीत टीका लिहिली व नंतर मराठीत तिची स्थळप्रत करून ती हिंदी टीका मानसपीयूषकडे धाडून दिली. यानंतर संपूर्ण अरण्यकांड, श्री रघुवीर विवाह, किष्किंधा व सुंदरकांड या भागाची टीका मराठीत लिहून त्यातील जे भाव 'मानसपीयूष'च्या प्रथमावृत्तीत नव्हते ते हिंदीतून मानसपीयूषकडे पाठवले गेले. प्रथमावृत्तीचे ते ते विभाग संपादकांनी श्रींच्याकडे अवलोकनासाठी धाडले होते व त्यांचे काम झाल्यावर ते परत संपादकांकडे धाडले गेले. टीकेला 'गूढार्थ-चंद्रिका' हे नाव हिंदी टीकालेखन सुरू असताना येथेच दिले गेले.

## मानसमणि सहयोग

त्याचप्रमाणे आणखी एक महत्त्वाची घटना म्हणजे १९५० पासूनच श्रींनी 'मानसमणि' या रामवन, सतना, मध्यप्रदेश येथून प्रसिद्ध होणाऱ्या, तुलसीरामायणावरील लेखांना प्राधान्य देणाऱ्या हिंदी मासिकाचे ग्राहकत्व स्वीकारले होते. १९५२ च्या नोव्हेंबर महिन्यात या 'मानसमणिच्या' अंकात 'मानस (काव्य) दोषारोप निराकरण' हा श्रींचा लेख प्रसिद्ध झाला. तो वाचून इंटर पास होऊन पोस्टात नोकरी करणाऱ्या श्री धनसिंह भदौरिया नावाच्या (कानपूरजवळील परौख, पोस्ट नोचारी, जिल्हा कानपूर) तरुणाच्या दर महिन्यास ६/७ शंका, समाधानासाठी श्रींच्याकडे येऊ लागल्या. व त्या टीकालेखनसमाप्तीपर्यंत नियमीतपणे येत होत्या. त्यामुळे सुमारे १५० शंकांचे समाधान श्रींना मानसाधारे करण्यास सापडले व टीकालेखनास फार मदत झाली. आश्चर्यकारक घटना ही की, टीकालेखनसमाप्ती व त्या भैय्या

धनसिंह भदौरियाचे देहावसान समकालीच झाले. श्रींचे प्रत्यक्ष दर्शन त्यास अखेरपर्यंत झाले नव्हते. ही अनपेक्षित ईश्वरी योजना अगदी थक्क करणारीच आहे. हा पत्रव्यवहार चालू असता श्री धनसिंह भदौरिया यांनी एका पत्रात, श्रींना आपणास अनुग्रह देण्यासाठी विनंती केली होती. त्यानंतर श्रींनी अंतर्ज्ञानाने त्याची योग्यता जाणून त्यास संकल्प दीक्षा दिली होती! त्यावेळी हा मुलगा अल्पायुषी दिसतो असे श्री म्हणाले होते आणि तेच खरे ठरले!

## 'रामवन' यात्रा

या सर्व गोष्टींमुळे व 'मानसपीयूष' मधील श्रींच्या टीकेमुळे उत्तर भारतातील मानसप्रेमी लोकांना श्रींचे नाव सुपरिचित झाले व त्यांच्या दर्शनासंबंधी त्यांच्या मनात उत्कंठा उत्पन्न झाली. यामुळे 'रामवन' सतना येथून १९५३ मध्ये श्रींना चैत्रात रामनवरात्रात होणाऱ्या 'मानसयज्ञा'साठी आग्रहाचे निमंत्रण आले. यावेळी श्रींचा मुक्काम चास-कमान येथेच होता. त्यामुळे चास-कमानहून पुण्यास येऊन मार्च ११ (बुधवार) १९५३ रोजी पुण्याहून 'रामवन' येथे श्रींनी प्रयाण केले.

रामवनच्या मुक्कामात रोज संध्याकाळी ५ वाजता श्रींचे हिंदीमधून रामायणावर प्रवचन होई. महाराष्ट्रीयन, एक संन्यासी आणि मानसावर एवढे प्रभुत्व हे पाहून ऐकणारी दिगूमूढ होऊन जात.

रामवनचा परिसर अत्यंत रम्य होता. तेथे रामायणातील वर्णनानुसार 'मानस सरोवर' 'चारी घाट' इत्यादी निर्मिती केलेली आहे. तेथे कमळाच्या वेली मुबलक, म्हणून तेथे असता कमळाच्या पानावर जेवण वाढले जाई. मानसयज्ञासाठी कलकत्ता, छत्तीसगढ इत्यादी दूरदूरच्या ठिकाणाहून लोक आले होते.

तेथून श्री स्वामीमहाराज जबलपूर येथे गेले. तेथे श्रींच्या हस्ते श्री दत्तमूर्तीची प्राणप्रतिष्ठा झाली. तेथून गोंदिया येथे श्रींचे एक शिष्य श्री. राजवाडे हे *Central Excise* मध्ये नोकरीस होते, त्यांच्याकडे श्रींचा मुक्काम झाला. तेथे असताही टीकालेखन सुरूच होते. या मुक्कामातच श्री. राजवाडे यांनी श्रींचा 'वेदान्त-सार-अभंग रामायण' हा ग्रंथ प्रकाशित केला.

यानंतर श्रींचे परत चासला आगमन झाले. रामवनहून श्री आल्याचे कळताच श्रींची शिष्यमंडळी मे-जून मध्ये श्रींचे दर्शनास येऊन गेली. शिवाय त्यावर्षी श्रींना ६० वर्षे पुरी झाली म्हणून साठीशांतीनिमित्त चास-कमानला सद्भक्तांचा एक मेळावाही भरविला होता. (१५ मे १९५३) त्याचवेळी 'अभिनव रामायण' हा श्रींच्या स्फुटकाव्याचा संग्रह प्रसिद्ध करण्यात आला.

## सगुण साक्षात्काराचा अपूर्व अनुभव

यानंतर सप्टेंबर १९ ला रविवारी श्रींचे आसन परत इस्लामपूरला आले. यावर्षीची दिवाळीही फार आनंदात गेली. दिवाळीच्या पाडव्याला अनेकांना श्रींनी मंत्रोपदेश दिला. यावेळी सर्वांना ध्यानास बसवून श्री विविध बीजोच्चार करीत व कुठल्या बीजोच्चाराचा कुणावर काय परिणाम होतो याचा अभ्यास केला जाई.

'ग्लौं' उच्चाराबरोबर गणेश दर्शन, 'ऐं' बीजोच्चाराबरोबर सरस्वतीचे दर्शन, या प्रमाणेच 'द्रां', 'रां', 'हं' इत्यादी विविध बीजोच्चार करून परिणामांची नोंद घेतली जाई. सप्टेंबर १९ (१९५४) ला श्री इस्लामपूरला आले ते जुलै १ (१९५५) पर्यंत इस्लामपूरला होते. जूनमध्ये सगुणसाक्षात्कारासाठी सर्वांनी मिळून निर्जळ, निद्रारहित, मौनयुक्त अनुष्ठान करावे असा विचार ठरला. त्याप्रमाणे ता. १६ जूनला असे अनुष्ठान सुरू झाले. त्यावेळी श्रींनी एक दिवस आधीच अनुष्ठानास सुरुवात केली होती. त्यात एकूण १४ स्त्री-पुरुषांनी भाग घेतला होता. ता. १८ ला सकाळी १० वाजता श्रींना एकट्यांना श्रीरामचंद्राचा सगुणसाक्षात्कार झाला. पदकमलापासून कटीपर्यंत स्पष्ट दर्शन झाले. पुढे वर दृष्टी जाताच श्रींचे देहभानच हरपले! त्यावेळची श्रींची प्रेमविव्हल अवस्था पाहून सर्व मंडळी घाबरूनच गेली! नंतर सावध झाल्यावर श्रींनी सर्वांना आश्वासन दिले. या अनुष्ठानात इतर सर्वांना 'प्रेमभक्ती' प्रभूंनी देऊ केली.

या अनुष्ठानाची समाप्ती शनिवारी रात्री १२ वाजता झाली. पाणी, सरबत वगैरे सर्वांनी घेतले. या अनुष्ठानात अन्नावाचून सर्वांचेच ८२ तास गेले. पाण्यावाचून व झोपेवाचून ४८ तास तरी गेलेच. ज्यांना पुढे निभले नाही त्यांना ४८ तासांनी थोडे पाणी घेऊन विश्रांती घेण्याची परवानगी श्रींनी दिली होती. या अनुष्ठानात देवदेवतांची दर्शने, ध्यानाच्या वा जपाच्या वेळी, अंतश्चक्षूसमोर सर्वांनाच झाली, दुसऱ्या दिवशी रविवारी ता. १९ जूनला श्रींना सगुणसाक्षात्कार झाला. पण यावेळी आदले दिवशीसारखी स्थिती झाली तरी कुणी घाबरले नाही.

यानंतर ता. १ जुलैला (शुक्रवारी) श्रींनी सातारला प्रयाण केले. यावेळच्या श्रींच्या सातारच्या मुक्कामात, ज्या विस्तृत टीकेच्या लेखनाचा प्रारंभ कार्तिक शु. प्रतिपदा शके १८७५ रोजी इस्लामपूर येथे झाला होता, ती परिशिष्ट लेखनासह श्रावण कृष्ण पंचमी शके १८७७ (८/८/५५) सोमवारी सातारा येथे लिहून पूर्ण झाली. (ही टीका डेमी आकाराची छापील पृष्ठे ६१०० होतील एवढी विस्तृत आहे.) त्यानंतर लगेच दुसऱ्या

दिवसापासून म्हणजेच ९ ऑगस्ट पासून म्हणजे श्रावण कृष्ण षष्ठी ते चतुर्दशीपर्यंत रोज एक पारायण याप्रमाणे श्रींनी श्रीराम चरितमानसाची नऊ पारायणे करावयाची ठरविले. हे कळताच परगावहून मंडळी येण्यास सुरुवात झाली. यावेळीही श्रवणास रोज १४ जण बसत असत.

यानंतर ऑक्टोबर १ ला श्रींचे इस्लामपूरला आगमन झाले खरे, पण चारच दिवसांनी ते परत साताऱ्याला गेले. यानंतर ऑक्टोबर महिन्याच्या अखेरीस सातारला श्रींची प्रकृती बिघडली म्हणून श्रींचा मुक्काम परत इस्लामपूर येथेच झाला.

१९५६ चा आषाढ महिना लागताच पूर्वी ठरल्याप्रमाणे चातुर्मासासाठी म्हणून श्रींनी सांगली येथे विष्णुमंदिरात राहण्याचे ठरविले व त्याप्रमाणे १० जुलैला दुपारी श्री सांगलीस विष्णुमंदिरात जाऊन पोहोचले.

यावर्षी कृष्णेस महापूर येऊन ऑगस्ट ३ ला शुक्रवारी विष्णुमंदिराचा संपूर्ण पहिला मजला जवळ जवळ पाण्याखाली गेला. लोक नावेतून ये जा करू लागले. त्यांनी श्रींना गावात वस्तीसाठी येण्याचा आग्रह केला. पण श्रींनी निवासस्थान सोडले नाही. मात्र रोज दुपारी ११ चे सुमारास धाबळी नेसून ते होडीतून गावात जात व करपात्र भिक्षा करून होडीतूनच परत मंदिरात येत. चोहोंकडे पुराचे पाणी, मध्येच हे विष्णुमंदिर व त्यात एकटे श्री वस्तीला ! पुराच्या पाण्याबरोबर नाग साप वाहत येत. तेही खिडकीजवळून जाताना दिसत.

१९५७ चा चातुर्मास इस्लामपूरला डॉ. वैद्य यांच्या जुन्या वाड्यात स्वतंत्र जागेत झाला व ५८ चा चातुर्मास माधवनगर येथे श्री. नातूशेठ यांच्या बंगल्यात संपन्न झाला.

## ७. मराठवाड्यातील वास्तव्य

१९५९ साली श्रींचा मुक्काम परांड्यास गेल्यानंतर समाधिकाळापर्यंतचे (१९६८) जास्तीत जास्त वास्तव्य मराठवाड्यांतच झाले. एकदाच नाशिक पंचवटी येथे जाणे झाले व त्यावेळी परत परांड्यास जाताना १९६१ साली थोडे दिवस इस्लामपूरला जाणे झाले होते. तसेच १९६६ साली काही महिने सातारा, चिकुर्डे येथे निवास झाला. गंगाखेड, लोहारा, उस्मानाबाद, परांडा वगैरे भागातच अधिक काळ निवास झाला.

४ मार्च १९५९ ला श्री गंगाखेड येथे प्रथम आले. गंगाखेड येथील

जहागिरदारांच्या श्रीकृष्ण मंदिरातील सभामंडपाच्या माडीवर स्वतंत्र खोलीत श्रीचा निवास होता. मंदिर श्री गोदेच्या काठी होते. चांगले सुंदर, एकांत, शांत व बंदोबस्तात असलेले. वरच दिवा, कंदील, बादली, लोटी व बादलीभर पाणी एवढी व्यवस्था होती. फक्त दोन वेळा स्नानाला व एक वेळ भिक्षेसाठी खाली उतरावे लागे. लोकांची उपाधी नसल्यासारखीच होती. षष्ठीपासून एकादशीपर्यंत मंदिरात मामुली उत्सव असे. त्यावेळी प्रवचने होत. नदीवर व भिक्षेस जाण्यास पायऱ्या खूप चढाव्या उतराव्या लागत असत. दूध सकाळ संध्याकाळ मिळण्यासारखे होते. पण श्रींनी न घेण्याचेच ठरविले. व दुपारी करपात्र भिक्षा जवळच्या घरी तेवढी घेत असत.

गंगेला अनेक घाट होते. घाटांजवळ गळाभर पाणी होते. श्रींनी तेथे वैशाखी क्षौरापर्यंत मुक्काम करण्याचे ठरविले होते. राणीसाहेबांचे व्यवस्थापक, रोज दोन वेळा येऊन चौकशी करून जात. उन्हाळयाचा त्रास बराच कमी होता व रात्री झोपण्यास आजूबाजूस गच्चीसारख्या जागा होत्या.

पुढे ता. १२ जून ला श्रींचे परांड्यास आगमन झाले व दुसऱ्या दिवशी स्नान उरकून देशमुखांच्या वाड्यात श्रींनी आपले आसन आणले. तो वाडा पिशाच्चग्रस्त होता म्हणून तिकडे कुणी फिरकत नसे. पण श्रींचे वास्तव्य तेथे झाल्यावर मुले बाळे सुद्धा वेळी अवेळी येत. पण कुणाला त्रास झाला नाही. कारण श्रींनी त्या पिशाच्यास बोलते करून कुणास त्रास न देण्याविषयी सक्त ताकीद केली होती. श्रींनी ताकीद केल्यावर कधीही कुणाला त्रास झाला नाही.

## सप्तरंगी पोथी लेखन

ता. १८ जूनपासून श्रींनी सप्तरंगी पोथी लेखनास आरंभ केला. लाखी शाई सप्तरंगाची तयार करून त्याने संपूर्ण तुलसी रामायण लिहून काढले. वैशाख शुद्ध १० (शके १८८१) ला लेखनास प्रारंभ करून ज्येष्ठ शुद्ध दशमीस लेखन पूर्ण केले. ही पोथी श्रींनी समाधी घेतल्यावर त्यांच्या आज्ञेवरून सज्जनगड येथे देण्यात आली आहे!

## श्री शिवपार्थिव लिंगार्चन

यावर्षी श्रींच्या प्रेरणेने श्रावण शुद्ध प्रतिपदेपासून सामुदायिक श्री शिवपार्थिव लिंगार्चन परांडा येथे सुरू झाले. ११ पुरुष आणि २१ स्त्रियांनी भाग घेतला होता. प्रत्येक जण १२१ लिंगे करीत असे. पूजा सांगण्यास ब्राह्मण असे. याप्रमाणे संपूर्ण श्रावण महिना मोठ्या आनंदात गेला. एकूण लिंगार्चन १,३९,०३९ इतके झाले. लिंगार्चन समाप्ती फार मोठ्या

प्रमाणावर झाली.

समाप्तीच्या दिवशी श्री स्वामी शिवपूजनाच्या पूर्वीच एका मोठ्या कोनाड्यात चौरंगावर व्याघ्राजिनावर बसले होते. प्राणप्रतिष्ठा मंत्र सुरू होताच, एका निमिषांत श्रींच्या ठिकाणी श्री शिवाचा जोरात पण प्रशांत शिवरुपाने संचार अगदी स्थाणू असा झाला. फक्त नेत्रात हालचाल होती. विसर्जन मंत्र म्हणताच निमिषार्धांत श्रींचे शरीर मोकळे झाले. मात्र तत्पूर्वी हात एकदम वरद होऊन सर्वत्र फिरला. दुपारी १।। वाजता श्री तेथून परत मठीत गेले. मग परत स्नान व फराळ वगैरे झाले.

अनेकांना लिंगार्चनात प्रत्यक्ष शिवजी लिंगावर येऊन बसून पूजा घेत आहेत किंवा मध्य लिंगावर श्री सद्गुरु व इतर लिंगावर शिवजी असा अनुभव आला. धन्य गुरुकृपा !

## रामवनचा अद्वितीय सत्कार

सप्टेंबर १० पर्यंत १६ पारायणे पुरी झाली होती व शिवपुराण सांगणे संपून अभंग रामायणावर श्रींची प्रवचने सुरू होती. ६-१० पर्यंत २५ पारायणे पुरी झाली. याच सुमारास रामवन (मध्यप्रदेश, सतना) येथे श्री स्वामी प्रज्ञानानंद पेटिका स्थापन होऊन त्यात रामचरितमानस (मराठी) गूढार्थ चंद्रिका नमुना अंक, प्रस्तावना खंड, मानसमणितील श्रींचे सर्व छापील लेख व श्रींचा पत्रव्यवहार वगैरे पेटिकेत ठेवला गेला.

फाल्गुन अखेर १०० पारायणे पुरी करावयाचा श्रींचा विचार होता. म्हणून मार्गशीर्ष पौर्णिमेपासून (दत्तजयंती) १५/१२/१९५९ पासून मानसाची द्विदिन पारायणे सुरू झाली. या सुमारास श्रींनी १९५३ साली जी हस्तलिखित पंचरंगी पोथी लिहून मानस संघ रामवनला दिली होती, ती त्यांच्या जागेतून कोणी व्यक्तीने चोरल्याचे पत्र रामवनहून आले होते. श्री रघुनाथांनी कदाचित ही परीक्षा घेतली असेल की श्रींना वाईट वाटते की काय? पण एखादी वस्तू कोणास दिली की तिचे काय झाले हा विचार करणे चूक असे श्रींचे मत असे, त्यामुळें ती हस्तलिखित पोथी कोणी रामायण प्रेमी व्यक्तीने चोरली असावी असे श्री म्हणाले.

## पिशाच्चांचा कायमचा बंदोबस्त

१९५९ ते १९६२ या चारही वर्षी श्रींचे चातुर्मास परांडा येथेच झाले. पण १९६३ चा चातुर्मास लोहाऱ्यास झाला आणि १९६४ सालचा चातुर्मास उस्मानाबाद येथे झाला. त्यावेळी श्री गरड वकिलांच्या वाड्यात माडीवर श्रींचे वास्तव्य होते. तेथें असताना श्रींची तब्बेत खूपच बिघडली होती. कमरेस

नागीण झाली होती. ती जरा बरी झाली तो एक दिवस पहाटे प्रातःस्नानाच्या वेळी एकाएकी चक्कर येऊन मोरीत खाली कोसळले. त्यावेळी जबरदस्त मार लागून दुखापत झाली. आरामखुर्चीवर बसावे लागे. भेंडीचे मूळ उगाळून लेप लावला जाई.

श्रींचे वास्तव्य असताना, उस्मानाबाद येथे गरड वकिलांच्या वाड्यात, श्री भागवताचा सप्ताह झाला. श्री हनमंताचार्य सप्ताह वाचत होते. त्या वाड्यात दोन मृतात्मे होते. एक बाळंतीण व एक समंध. श्री भागवत सप्ताह वाचणाऱ्या आचार्यांना फार त्रास होऊ लागला. दशम स्कंधाचे वाचन सुरू असता तर पिशाच्च्यांनी वाचणाराचे तोंड बंद केले. पोथी टाकून हणमंताचार्य माडीवर श्रींचे आसन होते तेथे पळत गेले. श्रींनी कमंडलूतील जल प्रोक्षण करून पिशाच्चाचे निवारण केले. त्यानंतर भागवत सप्ताह सुरळीत पुरा झाला. त्या काळात श्रींनी अनेकांना रोगमुक्त केले, अनेकांची पिशाच्चबाधा दूर केली !

## शंकर पार्वतीचे अपूर्व दर्शन

उस्मानाबादला असता एके दिवशी संध्याकाळी ६॥ वाजता स्नान करून गरड वकिलांच्या माडीवर श्री स्वतःच्या आसनाकडे चालले होते. गरड वकिलांचा छोटा मुलगा राम व राणी वडगांवकर ही मुले समोर बसलेली होती. तोच दक्षिणेकडच्या बाजूने नंदीवर बसून शंकरपार्वती श्री (स्वामी) जेथे आसनावर बसत तेथे आले. ही दोन्ही लहान मुले 'शंकरपार्वती' म्हणून ओरडू लागली. स्वामींनी हातानी मुलांना गप्प बसण्याची खूण केली. श्री. वडगांवकर तेवढ्यांत आले, तेव्हा 'शंकरपार्वती आले आणि गेले, तू आता नंतर आलास. तुला काही दर्शन झाले नाही, या मुलांना दर्शन झाले!' असे श्री म्हणाले. तसेच 'हे चौथे दर्शन!' असेही त्यावेळी म्हणाले.

## शेवट शेवटचे चातुर्मास

१९६५-६६ सालचे चातुर्मास परांडा येथेच राम विश्रामधामात झाले. त्यानंतर १९६७ साली श्रींचे वास्तव्य चातुर्मासात लातूरला होते. तेथे श्रीराम मंदिराच्या पडवीत चातुर्मास झाला. हा श्रींचा २५ वा चातुर्मास होता, व हाच शेवटचा चातुर्मास ठरला. कारण पुढील वर्षीच, १९६८ मार्च २३ लाच (फाल्गुन वद्य दशमी), श्रींनी प्रायोपवेशन करून पार्थिव देहाचा त्याग केला.

# ८. महासमाधी

वज्रादपि कठोराणि मृदूनि कुसुमादपि । लोकोत्तराणां चेतांसि को हि विज्ञातुमर्हसि ।। असे म्हणतात ना, ते अगदी खरे आहे. दुसऱ्याच्या दुःखाचा विचार मनात आला की, लोकोत्तर पुरुषांचे हृदय कुसुमाहून कोमल बनते. पण स्वसुखाविषयी स्वतःच्या, देहसौख्याविषयी ते प्रसंगी वज्रापेक्षा कठोर बनते. श्रींच्या संबंधीही असेच म्हणणे योग्य ठरेल.

१९६६ पासून श्रींच्या मनात प्रायोपवेशनाने देहत्याग करण्याचा विचार घोळत होता. जसे जसे दिवस लोटू लागले तसा हा विचार बळावतच गेला. परांडा येथेच फाल्गुन वद्यात प्रतिपदेपासून प्रायोपवेशन करून देह ठेवण्याचे ठरविले आहे तरी कुणालाही पौर्णिमेपर्यंत दर्शनास यावयाचे असेल त्यांनी यावे, याप्रमाणे सर्व शिष्यमंडळींच्याकडे पत्रे रवाना झाली.

पू. श्री. गुळवणी महाराज व पू. श्री. श्रीधरस्वामी महाराज ह्यांनाही पत्राने हा निश्चय कळविला गेला. त्यांची, तसेच इतर अनेक विद्वान मंडळींची पत्रे आली की आपण हे उपोषण करू नये. पण प्रत्यक्ष श्रीरामप्रभूंनी सांगितले तरच हा विचार रद्द करू अन्यथा एकदा ठरले ते ठरले असे श्रींनी कळविले.

एकदा प्रायोपवेशनाने देह ठेवण्याचे पक्के ठरल्यावर प्रत्यक्ष प्रायोपवेशन सुरू करण्यापूर्वी, एकाद्या कार्यक्रमाची पत्रिका तयार करतात तशा उत्साहाने श्रींनी आपला सर्व कार्यक्रम, प्रायोपवेशाने समाधिस्थ होणे आणि देहाची विल्हेवाट वगैरे सर्व गोष्टी शास्त्राप्रमाणे लिहून ठेवल्या होत्या व ब्राम्हणांना बोलावून सर्व गोष्टी समजावून सांगितल्या होत्या.

अगोदर समाधी बांधण्यास श्रींचा विरोधच होता. देह कुठल्यातरी नदीत सोडून द्यावा, किंवा चार तुकडे करून जंगलात टाकून द्यावा असे म्हणत. पण अनेकदा सर्वांनी विनंती केल्यावरून समाधीचे मान्य केले.

शिष्यमंडळींना पत्रे गेल्यावर एखादा अपवाद सोडून जवळ जवळ सर्वच मंडळी येऊन दर्शन घेऊन गेली. इतरही ज्यांचा परिचय होता किंवा ज्यांना केवळ ऐकून माहिती होती अशी आसपासच्या परिसरातील मंडळी दर्शनासाठी येऊ लागली.

'असे सकल रघुपती संपत्ती', अशी भावना श्रींची असल्याने श्रींनी सर्व वस्तूंची क्रमवार नोंद वगैरे करून व कुठली वस्तु कुणाला द्यावी याची नोंदही करून ठेवली होती. सेवाधर्म हा अति कठीण आहे हे जाणून कोण काय म्हणेल याची पर्वा न करता मृत्युपत्र-व्यवस्था पत्र लिहून ठेवले होते.

त्यात कुठली वस्तू कुणाची हे लिहून ती वस्तू त्या व्यक्तीस प्रसाद म्हणून देण्याविषयी लिहिलेले होते. तसेच सर्वांनाच काही ना काही वस्तू भेट म्हणून, प्रसाद म्हणून दिली गेली होती व तसे लिहून ठेवले होते. आश्चर्य वाटेल, पण अक्षरशः सुतळीचा तोडा, रद्दी, उरलेली शाई इत्यादीबद्दलही लिहून ठेवले होते. तसेच जी वस्त्रे पुरून टाकायची होती ती लगेच पुरावयास लावली. बरीच पुस्तके, ग्रंथ सज्जनगडावर देण्यास सांगितले. 'समाधीची जागा पाहिलीत का? पाहून या' असे दर्शनास येणाऱ्यास बजावीत. एखाद्या गावाला जाताना जशी आपण साग्रसंगीत तयारी करतो तशी श्रींची जणू एखाद्या मंगलकार्याला गावाला निघाल्याप्रमाणे शांतपणे, निर्विकार मनाने आणि प्रसन्न चित्ताने सर्व तयारी मोठ्या उत्साहाने चालली होती. ह्यावेळपर्यंत कुणा शिष्यांना त्यांच्या हितासाठी रागावले असतील तर त्यावेळी सर्वांना श्रींनी क्षमा करून टाकली होती व त्यांनाही दर्शनास येण्यासंबंधी कळविले होते.

होळी पौर्णिमेचा दिवस श्रींनी अन्न न घेता नुसतेच पाणी पिऊन काढला व दुसऱ्या दिवसापासून श्रींनी प्रायोपवेशन सुरू केले. रामविश्रामधामांत खूप गर्दी होईल म्हणून श्रींनी श्री. वासुदेवराव देशमुख यांच्या वाड्यात जाण्याचा निर्णय घेतला होता, व म्हणून तेथेच सर्व सोय केली गेली. प्रायोपवेशन फाल्गुन वद्य प्रतिपदेला सुरू झाल्यावर दररोज त्यांच्या दर्शनास शेकडो, हजारो भाविक येऊ लागले.

श्रींनी पहिले सात दिवस सारखे रात्रंदिवस आलेल्या लोकांबरोबर बोलणे सुरूच ठेवले होते. अन्नपाणी एकदा वर्ज्य म्हटल्यावर त्याचे नावही नाही आणि बोलणे मात्र सारखे सुरू! पुढे लघवी रक्तासारखी लाल होऊ लागली. जिभेवर सर्व भेगा पडल्या, फोड आले, पण श्रींना कशाची पर्वा नव्हती. कुणी 'आपण बोलू नका' म्हणून विनंती केली तर 'जाऊ दे, आता हे मडके लवकरच फुटणार आहे' असे म्हणत.

## काळजीत गेलेली नाथषष्ठी

श्रींनी प्रथम सांगितले होते की नाथषष्ठीस बहुतेक देह सोडू. त्यामुळे नाथषष्ठीला मंडळी काळजीतच होती. नऊ दिवसांचे तुळशीरामायणाचे पारायण चालूच होते. रामायणाची आरती झाल्यानंतर सर्वांची विचारपूस, बोलणे वगैरे रोजच्या प्रमाणेच चालू होते. दिवसभर रामनामाचा गजर होत होता. संध्याकाळी ५ वाजण्याचे सुमारास नित्याप्रमाणे श्री स्नानगृहात स्नानास गेले आणि स्नानास बसताना एकाएकी कोसळले. धावाधाव सुरू झाली. सोवळ्यात मंडळी सारखी कुणी ना कुणी असत. त्यांनी घोंगडी

घातली. दर्भ अंथरले. तुळशी टाकल्या. व काहींनी श्रींना स्नानगृहातून बाहेर आणले. त्यावेळी श्री थोडे शुद्धीवर आले. त्यामुळे त्यांना घोंगडीवर न ठेवता पलंगावर धरून बसविले ! थोड्या वेळाने श्रींनी सांगितले, 'अजून अवकाश आहे, घोंगडी काढून टाका.' घोंगडी वगैरे काढण्यात आली. श्रींना ग्लानी होती म्हणून पलंगावर बसविले. रात्री ९ च्या सुमारास श्रींना बरे वाटले; त्यावेळी एकाने विचारले, 'जलप्रवेश, पर्वतपतन, प्रायोपवेशन इत्यादी मार्गाने देहत्याग करणे योग्य आहे का?' त्यावर श्रींनी 'वृद्धयतीनी असा देहत्याग करू नये, पण यतीवृद्धांना असे करण्यास हरकत नाही' असे सांगितले.

सौ. जोशी (श्री. माधवराव जोशी यांच्या पत्नी) तेथे सोवळ्यांत सेवेसाठी असत. श्रींच्या जिभेवर भेगा पडल्या होत्या म्हणून मुळी लावताना श्रींची ती अवस्था पाहून जरा त्यात दोन थेंब पाणी जास्त घातले. त्या मुळीचा लेप लावू लागल्यावर ते गंध पाणी जास्त घातल्याने पातळ झाल्याचे श्रींना जाणवले. तेव्हा 'आम्ही एकदा अन्नपाणी वर्ज्य असे ठरविले असता, तू त्यांत जास्त पाणी का घातलेस?' म्हणून तशा परिस्थितीतही त्यांनी कानउघडणी केली.

नंतर दुसरे दिवशी रामायणाचे पारायण चालू असता श्रींनी, 'आज योग कोणता आहे?' असे विचारले. 'आज परीघ योग आहे,' म्हणून सांगितल्यावर श्री म्हणाले, 'आज जायचे नाही' तो दिवस नित्याप्रमाणेच गेला. प्रकृतीत फारसा फरक भासला नाही.

## शाळिग्राम हृदयावर सरकवून घेतला

नंतरचे दोन दिवस बोलणे फारसे नव्हते. स्नान वगैरे सुरूच होते, पण समाधी अवस्था असावी. नंतर १० व्या दिवशीही बोलणे बंद होते. सकाळ व संध्याकाळचे स्नान स्नानगृहात न होता तेथेच परातीत बसवून घातले गेले. सकाळपासूनच घोंगडीवर ठेवण्यात आले होते. बोलणे बंद असले तरी फारच वेदना वाढल्यास, 'श्रीराम, श्रीराम,' असा उद्घोष ते करीत असत. असाच सर्व दिवस गेला. रात्री एकच्या सुमारास डॉ. कुलकर्णी (त्यांच्या सेवेला रात्रभर होतेच.) यांनी वेळ जवळ आल्याचे जाणले व पूर्वी श्रींनी सांगितल्याप्रमाणे शाळिग्राम त्यांच्या छातीवर ठेवला. वास्तविक श्रींचे हातपाय अगदी गार पडलेले होते. तशा अवस्थेतही श्रींनी आपल्या दोन हातांनी तो हृदयावर सरकवून घेतला. पूर्वी सांगितल्याप्रमाणेच त्यांना (गंगाजळ व तुळशीपत्र) तीर्थ घातले गेले. यानंतर भजनाचा घोष सुरू असतांनाच (फाल्गुन वद्य दशमीला रात्री १ वा. १० मिनिटांनी) खाडकन्

डोळे उघडले गेले. (एकदम वीज चमकल्यासारखे झाले) आणि त्याचवेळी प्राण पंचतत्वांत विलीन झाले. अशा रीतीने श्रींनी सांगितल्याप्रमाणे सर्व गोष्टी घडल्या.

नेत्रांतून प्राण जाणाऱ्या माणसास वैकुंठ प्राप्त होतो असे शास्त्र आहे असे सांगत व आम्ही तसेच जाणार असेही म्हणत. तसेच झाल. ह्या काळात उस्मानाबादची खूप मंडळी आली होती. इतरही गावोगावची मंडळी दर्शनास येत होती. ४।५ गावची भजनी मंडळी, लेझीमवाले, मृदंगवाले, टाळकरी, माळकरी सर्व जमले होते. हरिजन, मुसलमान, सर्व तऱ्हेची अठरा पगड जात दर्शनास येत होती.

## ती अपूर्व रथयात्रा

सकाळी श्रींना स्नान घालून दर्शनाकरिता देह ठेवला होता. हजारोंनी दर्शन घेतले व दुपारी ११ च्या सुमारास गाडीचा रथ तयार करून सोवळ्यात फुले, हार, पूजा करून श्रींचा (स्वामींचा) देह त्यात बसवला. हातात कमंडलू व दंड दिला. रुद्राक्षाची माळ गळ्यात घातली आणि भजनी मंडळांतील लोक भजन करीत करीत सडे, रांगोळ्या घातलेल्या रस्त्यावरून थाटाने मिरवणूक श्री हंसराजांचे मठाकडे* निघाली. उन्हाळा, मार्चचे दिवस, त्यातही ११ ची दुपारची वेळ, तरी ५० ब्राम्हण सोवळ्याने अनवाणी रथ ओढण्यास तयार झाले. जवळ जवळ दहा हजार लोक मिरवणुकीत होते. अशी ही अपूर्व मिरवणूक दुपारी ४ च्या सुमारास श्रीहंसराज स्वामींच्या मठात आली. श्रींना परत स्नान घालून सोवळ्याची वस्त्रे, कटिसूत्र, कौपीन, जी त्यांनी स्वतः धुवून सोवळ्यात ठेवून सूचना देऊन, लिहून ठेवलेली होती की शेवटच्या वेळी विशिष्ट ठिकाणी वस्त्रे ठेवली आहेत ती वापरावी, त्याप्रमाणे तीच वस्त्रे त्यांना नेसवून, पूजा करून, आरती करून सर्वांनी अश्रुपूर्ण नेत्रांनी शेवटचा निरोप दिला. बरीच जनता ढसढसा रडली. सर्वांनाच खूप वाईट वाटले. पण श्रींनी सांगून ठेवले होते की, 'देहरूपाने गेलो तरी चैतन्यरूपाने मी तुमच्याजवळ आहे. तुम्ही कळवळून प्रार्थना करा. मी तुम्हाजवळच आहे.' असे सांगितले होते, त्याप्रमाणे सर्वांना अनुभव नेहमी येतो.

---

*परंडा (जिल्हा उस्मानाबाद) येथे श्री समर्थ शिष्य कल्याणस्वामी, नाथपंथीय कवी श्रीनाथभुजंग, सुप्रसिद्ध वेदान्ती संतकवी श्री हंसराज स्वामी, समर्थभक्त प. पू. श्री अनंतदास रामदासी इत्यादि महान संतांची समाधिस्थाने असल्याने त्याला संतभूमीचा गौरव प्राप्त झाला आहे. अनेक संतांच्या चरणस्पर्शाने पुनीत झालेल्या या भूमीतच स्वामी रमले नि चैतन्यरूप झाले.

कुणी काय करावयाचे हे श्रींनी आधीच सर्व सांगून ठेवले होते. त्याप्रमाणे श्री विद्वत् यांना श्रीचे मस्तकावर श्रीफळ फोडावयाचे काम सांगितले होते. त्यांनी 'दुसरे काही काम सांगा,' अशी प्रार्थना केली. पण 'तुला मूलबाळ नाही, आणि शास्त्रात असे सांगितले आहे की, समाधिस्थ होणाऱ्या संन्याशाच्या मस्तकावर निःसंतान माणसाने नारळ फोडल्यास त्यास संतान होते. त्याप्रमाणे तू शास्त्रप्रचीती घे. घाबरू नको. स्वामींची परवानगी आहे. तेव्हा तूच हे काम कर.' असे सांगितले. त्याप्रमाणे त्यांनी श्रींची आज्ञा पाळली आणि श्रींना समाधिस्थ होऊन एक वर्ष होण्याच्या आत, विवाहानंतर १२ वर्षांनी, त्यांना कन्यारत्न झाले. या मुलीचे नाव त्यांनी प्रेमादरपूर्वक 'प्रज्ञा' असे ठेवले आहे.

त्याचप्रमाणे समाधिस्थळी एकात एक असे दोन खड्डे काढावे लागतात. ते विशिष्ट मापाचे लागतात. त्या मापाच्या कळकाच्या काठ्या श्रींनी स्वतः तासून ठेवल्या होत्या. त्यावेळी कोणी विचारले 'हे काय करता?' तर सांगितले 'त्यावेळी शंभू (आदिनाथराव यादव) कदाचित् गडबडून जाईल व हे तुकडे तासतांना हातबित कापून घेईल म्हणून आम्हीच आधी तासून ठेवतो.' ह्या शिष्यवात्सल्याची तुलना कशाबरोबर करावी बरे! धन्य तो शंभू व धन्य ती गुरुमाऊली!

# ९. व्यक्तिदर्शन

शोभे कशी ही गुरुराजमूर्ती।
काषायवस्त्री प्रगटे त्रिमूर्ती।।
तेजें विराजे तनु गौरवर्णी।
रूपाद्भुता त्या कवि केवि वर्णी ।।१।।

भासे जणू देह धरी विराग।
प्रत्यक्ष आदर्श दिसेचि त्याग।।
ज्ञानार्कि नाहीं लवलेश आग।
ह्या प्रेमचंद्री नहिं लेश डाग ।।२।।

हातात शोभे जणु धर्म दंड।
मोडीतसे काममदादि बंड।।

विभूति भाली जणुं भक्ति पूर्ण।
संसार तापा करि तूर्ण चूर्ण।।३।।

हातीं सदा चालत रामसेवा।
सदा हृदिं चालत नामसेवा।।
त्राता तुम्ही ईशस्वरूप देवा।
त्राता तुम्ही श्री गुरुरूप देवा।।४।।

(ता. ४/७/५७)

श्रीगुरुराजमूर्ती - श्री स्वामी महाराजांची उंची साधारणपणे ५ फूट ३ इंच असावी. वजन ६५ किलोच्या आसपास. बांधा मध्यम, सदृढ, रंग गोरा पण गुलाबी झांक. डोळे घारे व अत्यंत तेजस्वी. दुसऱ्याच्या अंतःकरणाचा ठाव घेणारी नजर. सरळ पण किंचित् मोठी नासिका, भव्य कपाळ, पांढरे शुभ्र दात, डोळ्यात एक प्रकारचे तेज असे. त्यामुळे कोणावरही सहज छाप पडे. पाऊले अत्यंत कोमल, लालसर व लहान बालकाच्या पावलासारखी मृदु होती. त्यावर ऊर्ध्वरेखा होती. शरीरास एक प्रकारचा सुगंध येई. स्वतःसंबंधी बोलतांना 'स्वामी' असे म्हणत, चूकूनहीं 'मी' असे कधीं तोंडात येत नसे.

कटिसूत्र, कौपीन, कमरेला भगवे वस्त्र (छाटी) गुंडाळून, एक उपरणे भगवे पांघरत. बरोबर नेहमी दंड, कमंडलू असे. दंड कधीही जमिनीवर ठेवीत नसत. उंच ठिकाणी, बहुतेक करून दोन खुंट्यावर आडवा ठेवलेला असे. करवंटीने पाणी पीत. नेहमी रुमाल कमरेला खोचलेला असे. पायात सदैव खडावा, भस्म चर्चिलेले असे. साक्षात् शिवच!

## अलौकिक विद्वत्ता

अलौकिक पुरुषांचे सर्वच काही अलौकिक असते. त्यांच्या विद्वत्तेचे मोजमाप कसे करणार? श्री आळ्याच्या महाराजांच्या कृपाप्रसादाने ज्यांची प्रज्ञा जागृत झाली अशा श्रींच्या बुद्धीला कुठलाही विषय अप्राप्य म्हणून राहिलाच नव्हता. सर्व विषयात त्यांची बुद्धी सारख्याच कुशलतेने, कुशाग्रतेने कार्य करी. मराठी, इंग्रजी, संस्कृत, हिंदी, गुजराती या भाषांवर श्रींचे उत्तम प्रभुत्व होते. 'मानस गूढार्थ चंद्रिका' हा टीकाग्रंथ म्हणजे एक महान् ज्ञानकोशच आहे. ह्याविषयीं ज्यांनी कुणी तो ग्रंथ समग्र अवलोकन केला त्यांचे दुमत होणेच शक्य नाही. 'व्यासोच्छिष्टम् जगत् सर्वम्' याप्रमाणेच त्या टीका ग्रंथात आला नाही असा एकही विषय नसेल. कुठल्याही ग्रंथांचा अनुवाद तर इतका उत्कृष्ट होई की पाहून मती थक्क

होत असे.

श्रीमत् भगवत् गीता, श्रीतुलसी रामायण, वेदस्तुति, ब्रह्मस्तुति, श्रीगुरुगीता (प्रबोधिनी), परमामृत प्रकाश इत्यादि ग्रंथ पाहिले म्हणजे या गोष्टीची कल्पना येते. बहुतेक अनुवाद समवृत्त, समच्छंद असे केले आहेत. हे काम किती अवघड आहे हे सूज्ञांना माहीतच असेल. संगीताची जाण चांगलीच होती. पदे जी झाली आहेत ती रागदारीत म्हणण्यासारखी आहेत. शिक्षकाचा व्यवसाय पूर्वाश्रमात होता, त्यामुळे व्याकरणाचे व वृत्ताचे उत्तम ज्ञान होते; त्यामुळे बहुतेक सर्वच काव्य अत्यंत निर्दोष असे झाले आहे. मराठीत अनेक नवीन वृत्ते श्रींनी केली आहेत. 'नर्कुटक रामायण' हे अशा प्रकारचे एक उदाहरण आहे. अत्यंत मधुर, प्रासादिक, रसाळ अशी स्वतंत्र स्फुटकाव्ये वगैरे बरीच रचना झाली आहे.

त्यांच्या 'मानस गूढार्थ चंद्रिका' या ग्रंथाचा केवळ प्रस्तावना खंड अभ्यासून एक दोघांनी पी.एच.डी. पदवी मिळविली. मग असे ९-१० खंड होतील अशी विस्तृत, अतुलनीय व चित्ताकर्षक टीका ज्यांनी लिहिली, त्यांच्या विद्वत्तेचे मोजमाप कसे करणार?

श्रींचा ज्योतिषशास्त्र, मंत्रशास्त्र, तंत्रशास्त्र, वैद्यकशास्त्र वगैरे अनेक शास्त्रांचा अत्यंत सखोल अभ्यास होताच. शिवाय सर्वच विषयांत त्यांची प्रतिभा मुक्तपणे संचार करीत असे. इंजिनियर, डॉक्टर, वकील, शेतकरी, कारागीर, सुतार, गवंडी, माळी कुणीही असो, त्यांच्या धंद्यातील मार्मिक दृष्टांत देऊन त्यास अध्यात्म पटवून देत. अशावेळी वाटे, एवढी माहेती ह्यांनी गोळा केली तरी केव्हा व कुठून? पण हा आपला सामान्य माणसाचा विचार! श्रींच्यासारख्या सत्पुरुषांचे ज्ञान स्वयंसिद्धच असते हे आपण विसरतो. गृहिणीला स्वयंपाकातील खाचाखोचा सांगतील, केर कसा काढावा, सारवावे कसे इथपासून सर्व काही शिकविण्याची तयारी असे.

## चिकित्सक प्रयोगशीलता

श्रींच्या ठिकाणी चिकित्सक, संशोधकाची वृत्ती असल्याने जे करावयाचे ते उत्तम व्हावे यासाठी त्यात काय सुधारणा करता येतील इकडे सतत लक्ष असे. मंत्रांचे बीजोच्चार करून त्याचे परिणाम अजमावण्यासाठी सतत निरनिराळे प्रयोग चालू असत. शेवटपर्यंत ही प्रयोगशीलता टिकून होती. प्रायोपवेशनास सुरुवात केल्यापासूनच तेथे असलेल्या डॉक्टर नीळकंठराव यास सांगितले की 'आता हा देह जाणार तेव्हा प्रायोपवेशनाने या शरीरावर कोणकोणते परिणाम होतात याचे निरीक्षण करून पहा. **अनायासे संधी आलेली आहे.**' त्याप्रमाणे डॉक्टर वरचेवर रक्तदाब, नाडी व इतर

तपासणी अखेरपर्यंत करीत असत. तेव्हा अनेक वेळा त्यांना आश्चर्य वाटणाऱ्या नोंदी झाल्या. श्री. विद्वत् यांनाही वंश वाढावा म्हणून शास्त्रानुसार प्रयोग करण्यास (श्रीनी स्वतःच्या मस्तकावर नारळ फोडण्यास) परवानगी दिली होती हे आपण मागेच पाहिले.

## सत्यवक्तेपणा

वाचेस कधीही असत्याचा विटाळ झाला नाही. अशुद्ध अन्नाचा स्पर्श नाही. या योगाने एक प्रकारे वाक्‌सिद्धीच त्यांना प्राप्त झाली होती. सहज बोलत ते खरेच होई. आवडत्या विषयावर बोलू लागले की वाचेचा ओघ अनावर होई. श्रीसद्‌गुरु, श्रीराम, रामनाम, श्री तुलसी रामायण यासारख्या विषयावर किती बोलले तरी त्यांना व ऐकणारासही पुरे म्हणून वाटतच नसे. शास्त्रप्रचीती, गुरुप्रचीती, आत्मप्रचीती घ्यावी, अंधश्रद्धा नसावी, डोळस श्रद्धा असावी व मग विश्वास ठेवावा. गुरुवर निष्ठा किती असावी, *'There is not to question why but to do and die.'* या प्रमाणे निष्ठा असावी लागते असे म्हणत.

## दांभिकतेचा विलक्षण तिटकारा

दांभिकतेची श्रीना अगदी चीड असे. आपण एकीकडे सत्यनारायणाच्या पूजा करीत असतो व हवे तसे धडधडीत खोटे बोलतो ! आपले धर्माचरण हे असे असते! श्रीच्या बाबतीत असा प्रकार नसे. असत्याचा विटाळ ज्याच्या जिव्हेस कधी झालाच नाही, त्याची पूजाच खरे तर सत्यनारायणास पोहोचते. धर्मांचरणात दंभ नको, थोडे साधन करा पण मनापासून करा. प्रतिष्ठेसाठी, लौकिकासाठी करू नका. साधन किती झाले यापेक्षा कशा प्रकारे झाले याला महत्व आहे, अशी शिकवण असे.

साधनेमध्ये, तत्त्वामध्ये, तपस्येमध्ये, परमार्थामध्ये तडजोड नाही. पूर्ण १००% तयारी पाहिजे. १% कमी पडलेला सहन होणार नाही. म्हणूनच कित्येक शिष्य बऱ्यापैकी अधिकारी असूनही श्रीनी कुणालाही आपला उत्तराधिकारी नेमला नाही. सांप्रदाय वाढविण्याचा अधिकार कुणालाच दिला नाही. एखाद्या शिष्याची १००% तयारी होताच स्वामी त्यास दर्शन देऊन त्यांचे पूर्ण सामर्थ्य त्याच्या पाठीशी उभे करतील, व रामाच्या इच्छेनेच ही परंपरा पुढे चालू राहील. परमार्थाचा बाजार, ढोंग, फसवणूक होऊ नये म्हणून किती ही काळजी!

## निस्पृहता आणि शुद्ध चारित्र्य

लोभ काडीमात्र नसल्याने कुणाचाही मिंधेपणा नसे. 'निस्पृहस्य तृणं जगत्' निष्कारण कुणाचीही भीड धरली जात नसे. असेच एकदा एका श्रीमान् शिष्याने त्यांना उत्तम पैकी आश्रम बांधून देतो असे सांगितल्यावर 'मठाची उठाठेव या स्वामीला नको', असे म्हणून श्रींनी ती गोष्ट नाकारली.

## भक्तिप्रेमरसार्द्र अंतःकरण

श्रींचा ज्ञानापेक्षा भक्तीवर भर अधिक होता. सर्वसामान्यासाठी भक्तिमार्गच खरा. ज्ञानमार्गाचे अधिकारी फार थोडे असतात. ज्ञान झाले तरी भक्तीची आवश्यकता आहेच. जोपर्यंत जीव आहे तोपर्यंत वेदान्त, गुरु आणि ईश्वर यांची उपासना केलीच पाहिजे असे नेहमी म्हणत. शास्त्रप्रचीती, गुरुप्रचीती व आत्मप्रचीती, तिन्ही हवे. श्रीरामावर, नामावर अत्यंत दृढ श्रद्धा होती म्हणून नामाचा घोष करीतच देह विसर्जन केला. श्री तुलसीरामायण म्हणजे तर श्रींचा 'बहिश्चर प्राण'च असे केवळ त्याचे वर्णन करता येईल. रामायणाविषयी बोलू लागले म्हणजे भक्तिभागीरथीला नुसता पूर येई. ऐकणाराही यात मग्न होई.

अव्यभिचारी भक्तीविषयी त्यांचा कटाक्ष असे. एकदा इष्टदैवत कुठले ते ठरले की त्या एकावरच दृढ श्रद्धा ठेवावी. इतर देवतांची उपासना करतानाही आपल्या इष्टदेवतेचीच उपासना वास्तविक आपण करतो ही भावना हवी. 'एको देवो केशवो वा शिवो वा' असे हवे. एकच इष्ट दैवत हवे. तसे श्रीसद्गुरुंच्या ठिकाणीही अव्यभिचारी निष्ठा हवी. तरच त्यांच्या पूर्ण कृपेचा अनुभव येतो. तुमची निष्ठा डळमळीत असेल, तर तुमच्या भावनेस अनुसरून तुम्हाला अनुभव येणार! इष्टदेवतेचाही कुठल्या तरी विशिष्ट ध्यानाचाच अभ्यास करावा. कुठल्याही बाबतीत एकनिष्ठेतेचे महत्त्व आहेच. धरसोड प्रपंचांत किंवा परमार्थांत कुठेच उपयोगी पडत नाही. आधी दहा वेळा परीक्षा करा. पण एकदा निश्चित झाल्यावर मग मात्र त्याचा पाठपुरावा केला पाहिजे. 'निश्चयाचे बळ तुका म्हणे तेची फळ.' समर्थ हे रामभक्त, त्यांना पंढरपुरातही विठ्ठलाऐवजी रामरूपच दिसले व त्यांनी 'येथे उभा का श्रीरामा' असा प्रश्न केला. तसे तादात्म्य व्हायला हवे. सर्वत्र एकच रूप दिसले पाहिजे. एकदा एकाने त्यांना प्रश्न केला की, तुम्ही संन्यासी, मग तुलसी रामायण का वाचता? अशाने नरकात जाल. त्यावर श्रींनी उत्तर दिले की 'तुलसी रामायण वाचणारा संन्यासी नरकात जाणेच अशक्य! आणि या उपर जाणे झाले तरी या स्वामीची तयारी आहे. पण रामायण मात्र सोडणार नाही.

आणि मग स्वामी तेथे रामायण घेऊन गेला की त्या नरकाचा स्वर्ग बनेल.' अशी प्रखर निष्ठा होती. रामावर प्रेम तर इतके की नुसते 'राम राम राम' हे भजन म्हणू लागले तरी कंठ सद्‌गदित होऊन नेत्र पाझरू लागत. 'दयाळू राजाराम, माझा स्नेहाळू राजाराम, राम राम रामसीता, राम राम राम' हे अत्यंत आवडते भजन घोळून घोळून म्हणत, तेव्हा ऐकणाराचे डोळेही पाझरू लागत. राम हे मर्यादापुरुषोत्तम म्हणून त्यांच्या सेवकाचे वागणेही मर्यादशील हवे ही जाणीव श्रींच्या ठिकाणी नेहमी आढळे. सर्व गोष्टींचा सुवर्णमध्य साधत. मर्यादातिक्रमण कधीच करीत नसत.

## प्रखर सद्‌गुरुनिष्ठा

श्रींची सद्‌गुरुनिष्ठा अत्यंत प्रखर होती. 'श्री सद्‌गुरुवासुदेव सर्व मिदम् नारायण स्मरणम्' अशी पत्राची सुरुवात असे. श्री सद्‌गुरुंची आठवण झाली तरी नेत्रातून प्रेमाश्रू वाहू लागत. श्री बाबा गंगादास व श्री आळ्याचे महाराज यांची त्यांनी लिहिलेली चरित्रे वाचली कीं ह्या गोष्टींची कल्पना येईल. श्रींच्या ठिकाणी अहंकार अजिबात नव्हता. स्वतःला 'वासुदेवचरणरज' असे संबोधित. प्रत्येक गोष्टीत कर्ते करविते सद्‌गुरु, आपण केवळ निमित्त ही भावना असे. टीका वाचताना यासारखे उल्लेख पदोपदी आढळतात. व्यासपूजेच्या वेळी श्री आळ्याच्या महाराजांची आरती करताना प्रेमाने श्रींची जी अवस्था होई, तिचे वर्णन शब्दात करताच येणार नाही. संन्यास घेतला असूनही व आयुष्यात कसल्याच कामासाठी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष पैसा जमा केला नव्हता, तरी समाधी घेण्यापूर्वी गुरुदक्षिणा व ग्रंथविक्रीच्या पैशातून श्रींनी बाबा गंगादास धर्मशाळा व श्री वासुदेव कूप बांधवून या आपल्या दोन्ही गुरूंचे स्मारक निर्माण करून ठेवले व अप्रत्यक्षरीत्या गोरगरीब जनतेची सेवा केली. त्यावेळी परंडा येथे पाण्याचे फार हाल असत व कुणी बाहेरगावचे आल्यास उतरण्यासारखी धर्मशाळा वगैरे काहीच सोय नव्हती. आता गावात पाणी आल्याने व इतर सोयी झाल्याने या दोन्ही स्मारकांचे महत्व कमी झाले असले तरी त्यामागील श्रींची सद्‌गुरुनिष्ठा व प्रेम हे लक्षात घेण्याजोगे आहे.

## आणि अजोड शिष्यवात्सल्य

श्रींची सद्‌गुरुनिष्ठा जशी अत्यंत प्रखर होती, तसे शिष्यवात्सल्यही खरोखर अजोड होते. असे सद्‌गुरु प्राप्त होण्यास खरोखर ईश्वरी कृपाच व्हावयास हवी! शंभूचा (आदिनाथ यादव) हात चाकूने कापू नये, म्हणून समाधी स्थानाच्या खड्ड्याच्या मापाचे कळकाचे तुकडे स्वतः ज्यांनी तासून

ठेवले; आपल्या एका अडाणी कन्यकेच्या पायास अतोनात भेगा पडल्या, तिला चालतांना त्रास होतो हे पाहून स्वतः तिच्या पावलांवरील भेगांत ज्यांनी बिब्बा भरला; त्या श्री गुरुंच्या वात्सल्याचे वर्णन कसे करणार! तसेच कुणा शिष्याच्या पाठीत उसण भरली तर स्वतःच्या हातांनी त्याच्या पायाची ठराविक शिर चोळून पाठ बरी करत व परत स्वतः स्नान करत! 'तुजसम शोधू कुठे मी दुजा' असे म्हणून चरण धरावे व मौन रहावे हेच बरे!

यापेक्षाही शिष्यवात्सल्याचा पुरावा म्हणजे ज्यावेळी हरिभट्ट ह्या श्रींच्या एका शिष्याने श्रींच्यावरच मारणाचा प्रयोग केला व तो त्याच्यावरच उलटला, त्यानंतर ता. ९/७/४५ ला श्रींनी प्रभूंना प्रार्थना केली आहे की दास छळकांवर कोपू नको. त्यांना दैन्यवाणे ठेवू नको. पायापाशी ने. जननीस, पुत्र कोपला तरी, शिक्षेस योग्य असूनही माता क्षमाच करते. मग गुरुमाऊली तर जननीपेक्षाही प्रेमळ!

## धन्य ती सेवा, धन्य ते जीवन

श्रींचे संपूर्ण जीवन तर अत्यंत शुद्ध, पवित्र, तेजस्वी, सर्व सद्गुणसिंधू, सामर्थ्यशाली, आदर्श होतेच, पण श्रींच्या निर्याणाने यासर्वांवर कळस चढविला. श्री ज्ञानेश्वर माऊली व शांतीसागर एकनाथ महाराज यांच्याप्रमाणेच श्रींचे निर्याणही अतिभव्य, उदात्त, तेजस्वी, सामर्थ्यशाली, मार्गदर्शक असे ठरले. जुनी वस्त्रे सहज लीलया टाकून नवीन परिधान करणे, माहेरच्या ओढीने माहेरी जाणे, याप्रमाणे शेवटचा सोहळा झाला. अखेरची निरवानिरव करतांना जणू काही रामचंद्रांच्या भेटीची ओढ लागली आहे अशी उत्कंठा दिसत होती. मंगलकार्यांत जसे आपण उत्सुकता, घाई अधीरपणा दाखवतो तसे सर्व चालले होते. शेवटपर्यंत सर्वांना उपदेश करणे, मार्गदर्शन करणे चालूच होते. श्रींनी रामायणाच्या अनुवादात प्रार्थना केल्याप्रमाणे 'देवा प्रज्ञानाला द्यावे जो काय संघ निश्वासे । सेवा विश्वाची, या तव रूपाची, घडो सुविश्वासे ।।' अखेरच्या श्वासापर्यंत या विश्वाची, या रामरूपाची सेवा खरोखर घडत होती! धन्य असे जीवन! धन्य असे लोकोत्तर निर्याण!

'काय वानू तया संताचे उपकार। मज निरंतर जागविती' याप्रमाणे निरंतर आम्हाला जागविणाऱ्या त्या श्री सद्गुरुंच्या चरणी शतशः प्रणाम करून हे चरित्र त्यांचे त्यांनीच वदवून घेतले आहे; तसे त्यांचे त्यांनीच वाचकरूपांनी हे गोड मानून घ्यावे अशी चरणी प्रार्थना करून हे सेवापुष्प समर्पण केले आहे.

# आरती

आरती श्री गुरुरायाची । श्री प्रज्ञानानंदाची । ।
जेथे सहज होई वास । तेथे दिनोद्धार खास ।
कितिही पातकाची रास । करीना विन्मुखही त्यास ।
निष्कपट होऊनिया । भरवसा दुजा सोडुनिया ।
येई जो शरण । धरी जो चरण ।
नित्य करी स्मरण । तया दे छाया कृपेची । । १ । ।
ज्यावरी कृपा राघवाची । तयासिच भेटी हो तुमची ।
लेकरे सर्व ही भाग्याची । तया द्या सेवा पायाची ।
सर्वदा चुकत असोनिया । करितसां तुम्ही किती माया ।
शक्य उतराई । नसे प्रज्ञाई ।
नमी जो पायि । तयासी लूट आनंदाची । । २ । ।
परांडे ग्राम धन्य खास । श्रींचा जिथे नित्य वास । ।
पाहुनि समाधिस्थानास । अश्रू येती लोचनास ।
पुण्यतिथी पर्वणीला । भाविक येती दर्शनाला ।
निरसूनी पाप । शमवूनी ताप ।
शांतीचे माप । घालतो पदरी जो त्याची । । ३ । ।

# १०. श्रींची शिकवण

## भाव तसा देव

भारतांत हिंदूधर्मीय सर्वच मूर्तिपूजा मानतात आणि त्याप्रमाणे घरोघरी देवांच्या मूर्ती असतात. कुटुंबप्रमुख किंवा त्याची सहधर्मचारिणी ह्या देवांची रोज पूजा करतात. ईश्वराकडे अनुसंधान रहावे म्हणून या प्रकारच्या पूजेची अत्यंत आवश्यकताही आहे. पण ही पूजा करीत असतांना इतरत्र जर मन धावत असेल तर काय उपयोग? ही गोष्ट पटवून देण्यासाठी पू. स्वामी एका सतीची गोष्ट सांगत.

एका गांवात एक सधन गृहस्थ रहात होता. घरी गाई गुरे, नोकर चाकर भरपूर होते. दहाजणांचे घर. येणारा जाणारांचा राबता असे. गृहस्थ धार्मिक वृत्तीचे पण जरा कर्मठच म्हणाना! सोवळे ओवळे कडक असायचे! तासन् तास पूजा अर्चा चाले. पूजेचाही अगदी थाट असे. पण अशा सधन कुटुंबातही एक दुर्दैवी जीव नांदत होता. ती होती त्या गृहस्थाची सून. गरिबाघरची पण रूपाने गुणाने चांगली म्हणून करून घेतली होती. पण माहेरचे काहीच देणे घेणे नाही, त्यामुळे मनांतून अगदींच उतरली होती.

तिला सदैव हिडिस फिडिस करण्यांत येई. शिळेपाके, उष्टे खरकटे तिच्यापुढे ठेवण्यात येई. पण ती होती सात्त्विक. हाताने सांगितलेले काम करीत राही, मुखांत सदैव नाम असे. शुद्ध चारित्र्य, नम्रता, पवित्रता यामुळे अंगावर मंगळसूत्राखेरीज दागिना नसला तरी ती तेजस्वी दिसे. दळण कांडण, धुणी-भांडी, गाई गुरांचा शेणगोठा सर्व काम तिला करावे लागे. दळण दळून पीठ घरांत दिल्यावर जात्यांतील राहिलेले पीठ झाडून काढी, गाईच्या दुधांत मळे, गोवऱ्यावर त्याची एखादी दशमी टाकून ती खाई. शिळे-पाके, उष्टे-खरकटे मिळे ते ती गुरावासरांना चारी. असा तिचा दिनक्रम चाले.

एकदा देवघरांत मामंजींची पूजा चालली होती. सून बाहेर अंगणाची झाडलोट करीत होती. एवढ्यांत सासऱ्यांच्याकडे शेतावरून कुणी रामोशी वगैरे आला आणि त्याने बाहेरूनच हाळी दिली. ''पंत आहेत का घरांत?'' आंत तर पूजा चालली होती. पूजा करतांना बोलायचे नव्हते. सुनेने बाहेर परस्पर उत्तर दिलेले त्यांनी ऐकले! 'बरं तर बसतो तोवर' हे उत्तरही ऐकू आले. गृहस्थ पूजा आटपून बाहेर आले तोवर उशीर झाला होता. आलेली व्यक्ति निघून गेली होती. सुनेला हाक मारली आणि ''कोण आले होते?'' म्हणून विचारले. तिने नाव-गाव सांगितले. ''गेला केव्हां?'' म्हणून विचारले तेव्हां सुनेने उत्तर दिले, ''आपण जोड्यासंबंधी विचार करीत होता तेव्हां!''

उत्तर ऐकून सासरा चपापलाच! पूजा करताना मध्येच नव्या जोड्यासंबंधी विचार येऊन गेला खरा! पण हिला कसे कळले? जो जो विचार करू लागला तो तो सुनेची योग्यता त्याला कळली. हिला जे साधले ते आपल्याला अजून साधता आले नाही. असे मनांत येऊन खंत वाटली. ''मुली! तुला कस कळले मी जोड्यासंबंधी विचार करीत होतो ते!'' सून काही बोलली नाही, फक्त हंसली! सासरा उमगला, त्याने सुनेचे पाय धरले!

थोडक्यांत आपले असेच होते. आपण पूजेला बसतो. सर्व उपचार चालू असतात पण त्याचवेळी आपले मन मात्र नको त्या गोष्टीचा विचार करीत असते. असे नसावे. हातात काम असूं द्या पण चित्त भगवंताकडे लागू द्या. त्याने तो अधिक संतुष्ट होतो. याचा अर्थ पूजा अर्चा करू नये असा नाही. तर उलट करतांना लक्ष सर्वस्वी भगवंताकडेच असावे. 'मोटके निमिष द्यावे' पण ते सर्वार्थाने द्यावे.

श्री. पू. स्वामी नेहमीं सांगत की **'यथा देहे तथा देवे.'** पूजा करतांना मूर्तीच्या ठिकाणी सच्चिदानंद स्वरूपाची कल्पना करणे हे एकदम जमणार नाही पण निदान त्या अचेतन, जड धातूच्या, अशी भावना तरी नसावी. कित्येकजण मूर्तींना चिंच, रांगोळी लावून त्या घासतात, कसं त्यांना काही वाटत नाही? तुम्ही तुमचे अंग घासाल का असें चिंच, रांगोळी लावून? तुम्हांला मात्र लिंबू, शिकेकाई, ऊन पाणी आणि देवाला चिंच आणि रांगोळी, कां रे बाबा? असे करू नये!

देवपूजा करतांना कधी हातांतून शाळिग्राम निसटला तर मन लगेच चरकले पाहिजे! घरांतले लहान मूल जरा पडले की अंतःकरण कसे कळवळते! आणि गणपती, देवी यापैकी कुणी पडले तर हा आपला निर्विकार! मग पूजा देवाला कशी पोचणार? मूर्तीच्या ठिकाणी देवत्व आहे ही भावना असेल तरच अंतःकरण कळवळेल! तसे झाले तर तुम्ही देवाला चटकन् उचलून घ्याल, त्याचे पापे घ्याल, त्याला पदराने पुसाल, स्वतःच्या दोन थोबाडीत मारून घ्याल! अशी पूजा देव नक्कीच स्वीकारील, गोड मानून घेईल!

सद्भावाने दिलेले नुसते पाणीही देवाला पुरेसे होते याचा अर्थ असा नव्हे की आळसाने सर्व उपचारच टाळावेत. वेळ, पैसा, आरोग्य सर्व काही उपलब्ध असेल तर व्यवस्थित सर्व उपचारांनी पूजा करावी. पण लोकांची फुले चोरून आणून ती देवाला वाहिली तर त्याने देव कसा संतुष्ट होईल? रामचंद्र एवढे राजपुत्र, जनकाचे पाहुणे म्हणून मिथिलेत गेले तर त्यांनी सुद्धां माळ्यांना शोधून, त्यांना विचारून मग बागेतील फुले काढली; आणि विश्वामित्रांना पूजेसाठी आणून दिली. तेव्हां जी सामुग्री पूजेसाठी वापराल

त्यात शुद्धता हवी.

सगुणोपासना करायची तर नियमित वेळ, नियमित स्थळ असेल तर मनास अधिक प्रसन्नता वाटते. जागा एकांत, पवित्र असावी. तेथे इतर प्रापंचिक गोष्टी शक्यतो करू नयेत. जागेचे पावित्र्य हे निश्चितच लाभदायक ठरते. आपले स्वतंत्र आसन असावे. ते सहसा कुणास वापरू देऊ नये. माळही वाटेल तेथे ठेवू नये. व्यवस्थित डबीत वा गोमुखीत ठेवावी.

नियमित वेळी जर तुम्ही ध्यानास बसत असाल तर हळूहळू त्या विशिष्ट वेळी तुम्हांस विशिष्ट प्रकारचा सुगंध येणे, विशिष्ट नाद ऐकूं येणे वगैरे अनुभव येऊ लागतील. यासंबंधीहि पू. स्वामी एक गोष्ट सांगत असत.

एक सैनिक होता. तो महान् भगवद्भक्त होता. पण त्याच्या सैनिकी पेशामुळे त्याला साधना करण्यास जास्त वेळ मिळत नसे. त्यामुळे त्याने पंच-पंच उषःकालापूर्वीच उठावे व नित्यविधि आटोपून आपल्या राहुटीत नियमित वेळी इष्टदेवतेची मानसपूजा करावी असा नियम ठेवला. फक्त अर्धा तास तो यांत घालवी पण त्याची नियमित वेळ ठरलेली होती. अशी काही वर्षे गेली. मानसपूजेत तो अगदी तल्लीन होई. नाना उपचार प्रभूला अर्पून त्याला अत्यंत प्रसन्नता वाटे. पुढे असे होऊ लागले की जे उपचार अर्पण करावे त्याचा प्रत्यक्ष अनुभव त्याला येऊ लागला. गुलाबाची फुले वाहिली, तुळशीचा हार वाहिला तर त्या त्या सुगंधाचा अनुभव त्यास येऊ लागला.

एकदा असे झाले की काही कारणाने त्या सैनिकाच्या तुकडीस, तो ज्यावेळी मानसपूजा करी त्यावेळेसच कूच करण्याचा हुकूम झाला. त्याप्रमाणे इतरांबरोबर तो सैनिकही घोड्यावर बसून तुकडीबरोबर चालला होता. तोच असा चमत्कार झाला की ती विशिष्ट वेळ येताच त्याचे मन अंतर्मुख होऊन आपोआपच मानसपूजा सुरू झाली. त्याबरोबर शरीर एकाएकी तटस्थ बनले. आश्चर्य म्हणजे त्याचा घोडाही एकाएकी जागच्या जागी थांबला. बरोबरच्या अधिकाऱ्याचे तिकडे लक्ष गेले. प्रथम त्याने सैनिकास बऱ्याच हाका मारल्या पण हा देहभान विसरून मानसपूजेतच दंग होता. तेव्हां त्या अधिकाऱ्याने आपल्या हातातला चाबूक एकदम फटकारला. त्याबरोबर पूजेची चांदीची उपकरणी धडाधड खाली पडली व त्यांतील दही, दूध, तूप, मध, साखर वगैरे जमिनीवर सांडले. इकडे त्या सैनिकाच्या मानस पूजेतही एकदम विक्षेप येऊन पंचामृत का सांडले असे वाटून तो एकदम सावध झाला व डोळे उघडून पाहू लागला. तेव्हा लगेच काय घडले असावे हे त्याच्या लक्षांत आले. त्याच्या अधिकाऱ्यालाही भांडी वगैरे कोठून आली काहीच

कळेना. त्याने खुलासा विचारल्यावरून त्या सैनिकाने त्यांना मानसपूजेच्या नियमाबद्दल व विशिष्ट वेळेस येणाऱ्या अनुभवांबद्दल सांगितले. तेव्हा त्या अधिकाऱ्यास फार आश्चर्य वाटले. त्या सैनिकाने मात्र तात्काळ नोकरीचा राजिनामा देऊन प्रभुसेवेतच आपले आयुष्य घालविले.

## ज्ञानासंबंधी प्रश्न

**१. निद्राकाळी आत्मा काय करीत असतो?**

**'निद्राकाळी देह असुनिही ज्ञान काहिही त्या नाही'- त्या देहाला त्यावेळी काही ज्ञान नसते. आत्मा सर्वत्र व्यापक** - आकाशासारखा फार तर म्हणता येईल, असा आहे. तो कधीच काहीही चांगले किंवा वाईट करीत किंवा करवीत नाही. तो सदा ज्ञानरूप, झोप, स्वप्न इत्यादि अवस्था नसलेला सदा सुखरूप, आनंदरूप असतो. त्याला करणारा कोणी नाही. तो करवीत नाही, करीत नाही. भोगीत नाही. भोगवीत नाही. त्याला जन्म, मरण, भूक तहान, हर्ष शोक, सुख दुःख काही नाही. रात्र असली म्हणजे सूर्य काय करतो? तशीच झोप ही बुद्धीची रात्र आहे. आत्मा ज्ञानरूप जसा सूर्य प्रकाशरूप सर्वदाच असतो. सूर्याला प्रकाश व अंधार माहीत नाही. तो काही करीत नाही. पण तो दिसत नाहीसा झाला म्हणजे वाचणे, हिंडणे, फिरणे, दूरचे बघणे इत्यादी काही करता येत नाही. त्याचप्रमाणे आत्मा केव्हांच काहीही करीत नाही आणि करवीत नाही. पण त्याच्या मदतीवाचून काहीच करता येत नाही. इतके सध्या चांगले लक्षांत ठेव. आत्मा ज्याला म्हणतात तो तूच आहेस. बाकी इतर तूं नाहीस हे पण लक्षांत ठेवून सतत आठवण असू दे.

**२. जाग कशी येते?**

बुद्धीत पडलेले जे आत्म्याचे प्रतिबिंब त्याला जीव म्हणतात. जीवाने पूर्वीच्या जन्मात केलेल्या कर्माचे फळ चांगले, मध्यम, किंवा वाईट भोगण्यासाठी जन्म घ्यावा लागतो. देहरूपी घरात तो रहातो. बुद्धि, मन, इंद्रिये व प्राण या साधनांनी तो कर्माचे फळभोग भोगतो. व नवीन कर्म स्वतः करीत नसून त्यास वाटते की मीच कर्ता आहे. त्याला भोग मिळवून देण्यासाठीं श्रीमंतांच्या नोकरांप्रमाणे बुद्धि वगैरे श्रम करतात, दमतात थकवा येतो म्हणून बुद्धि झोपी जाते. बुद्धी कार्य करेनाशी होते. मन, प्राण, इंद्रिये यांना प्रेरणा बुद्धीकडून मिळते. तीच झोपली म्हणजे बाकीच्यांची कामे पण थांबतात. पण पूर्व कर्माच्या बळाने ती बुद्धी पुरेशी विश्रांती मिळाल्यावर आपोआप जागी होते आणि सर्वांना कामाला लावते बुद्धीस जागृत करण्यास

कारण म्हणजे तिच्यावरच झालेले पूर्वकर्मांचे संस्कार व त्या जीवाची भोग-प्रारब्ध शक्ति हिला आपण काळ म्हणू. झोपेस नेणारी शक्ति तमोगुणी आहे व जागृत करणारी शक्ति रजोगुणी आहे असे ठोकळ मानाने म्हणता येईल. ज्याप्रमाणे उन्हाळा, पावसाळा, थंडी हे काळाच्या प्रेरणेने येतात व जातात तसेच झोप व जागे होणे यांचे आहे. एखादे वेळी लवकर उठावयाचे असले म्हणजे आपण पुन्हा पुन्हा संकल्प करतो की ३।। वाजता उठावयाचे आहे, उठले पाहिजे म्हणजे मग बरोबर त्या वेळी किंवा किंचित आधीच जी जाग येते ती त्या संकल्पाचे चित्तावर झालेले संस्कार, त्या संस्काराच्या बळाने येते तसेच कर्माचे जे संस्कार त्यांच्या योगाने जाग येते.

### ३. आत्मा दुःखादिक का भोगतो ?

आत्मा भोग भोगणारा नाही. जीव भोग भोगतो. जसे आकाशांतील सूर्य हा आत्मा समज. पाणी ही बुद्धि समज. त्या पाण्यांत पडलेले सूर्याचे प्रतिबिंब हा जीव समज. पाणी हलले म्हणजे प्रतिबिंब हलते. हलल्यासारखे वाटते. मुले म्हणतात सूर्य कापतो आहे पण सूर्य हलत नसतो. थरथर कापत नसतो. पाणी मळकट (गढूळ) असले की प्रतिबिंब मलीन दिसते पण सूर्य मलीन झालेला नसतो. पातेल्यांत सूर्य अडकलेला दिसला तरी सूर्य काही पातेल्यांत पडलेला नसतो. तो स्वतंत्र, अकर्ता असतो, तसाच आत्मा असतो. बुद्धीने केलेले मी केले असे बायल्या पुरूषाप्रमाणे जीव मानतो म्हणून त्यांस बुद्धीच्या संगतीने चांगले वाईट भोग भोगावे लागतात. बुद्धी मनाच्या तंत्राने वागणारी असली व बहुतेक लोकांची असतेच म्हणजे मनाने केलेले मी केले असे ती मानू लागते व भोगावे लागते मात्र जीवाला.

××=××

ज्ञानाची वा मोक्षाची इच्छा बाळगू नका. ज्ञान म्हणजे मी ब्रम्ह आहे हे कधी न विसरणे. 'मी' आणि 'माझे' वाटणे म्हणजे बंध आणि 'मी' आणि 'माझे' असे काही नसून 'सर्व ब्रह्म आहे' असे न विसरणे म्हणजेच मोक्ष. हरिभक्ति प्राप्तीसाठी डोळ्यात पाणी आणून कळवळून प्रभूला प्रार्थना करीत जा. म्हणजे 'भक्ति' म्हणजे भगवंतावर अनन्य प्रीति प्राप्त होईल. मनुष्य आपल्यावर प्रेम करतो त्यापेक्षा जास्त प्रेम भगवंतावर अनन्य भावाने करणे म्हणजेच भक्ति. अशा भक्तिप्राप्तीसाठी तळमळणाऱ्याला ज्ञान सहज प्राप्त होते.

अभिनव रामायणातील वेदांतपर भूपाळीचेच सतत मनन चिंतन करीत जावे. 'अमृतानुभव' हा ग्रंथ सिद्धांच्यासाठीच आहे. व 'ज्ञानेश्वरी'

त्याचीच बहीण. ग्रंथ वाचून कोणीही ज्ञानी किंवा मुक्त होऊ शकत नाही. भक्तिमार्गीय ग्रंथ, तसेच रामायण वगैरे वाचावे व सतत प्रभूनामस्मरण करावे. परनिंदा, परदोषवर्णन असत्य भाषण इत्यादि साफ सोडले पाहिजे. हे पथ्य परमार्थेच्छूनी पाळलेच पाहिजे.

'पी हळद नि हो गोरी' असे परमार्थात होऊ शकत नाही. हळूहळू ज्ञानलालसा तृप्त होईल. त्याची चिंता करू नये. कोणाच्या दोषांचे वर्णन करू नका. शठासि शठ वगैरे राजकारणातले सिंद्धात आहेत. परमार्थातले नाहीत. जग काय करते ते बघू नका. स्वतः काय ते करा. असत्य कोणत्याहि निमित्ताने कोणीशीही एकदा बोलले गेले तरी ''रौरव' नांवाच्या नरकांत पडावे लागते. 'न हि असत्य सम पातक पुंजा। गिरिसम होती कोटि किं गुंजा'.

असत्यासारखा पापाचा पर्वत नाही. इतर सर्व पातके कोट्यावधी गुजांच्या ढिगाऱ्यासारखी आहेत. त्यांना कधी शीग लागत नाही. स्वतःचा प्राण जाणार असला तरी खोटे बोलता कामा नये. आपल्या खरे बोलण्यामुळे दुसऱ्या कोणाही मनुष्यादि प्राण्याला मरण येत असेल तर मात्र खरेहि सांगू नये व खोटेहि बोलू नये. कशातरी वेळी मारून न्यावी.

खोटे कोणाशीच बोलू नये. दुसऱ्यांच्या प्रश्नाचे खरे उत्तर देणे योग्य नसेल तर 'त्याचे उत्तर मी देऊ शकत नाही' असे स्पष्ट सांगावे.

ज्यांच्यावर पुत्रकन्यादि सारखे प्रेम केले ते लोक आपल्याशी जर फटकून वागू लागले तर खंत करू नये. ह्यामुळे ममतारूपी पाश कमी होऊ लागतो. मोठ्या मुलाचे लग्न होऊन तो मिळवता झाला आणि त्याची भावंडे मिळवती नसलेली १०/१५ वर्षाची असली म्हणजे मोठ्या मुलावरील आईबापांचे प्रेम कमी होऊन ते धाकट्या मुलांची कड घेऊन मोठ्या मुलाशी व सुनेशी नीट वागेनासे होतात. आजकाल तर मुलगे मिळवते झाले, लग्ने झाली म्हणजे ते आई बापांना सुद्धा विचारेनासे होतात. बापांस दिडकी सुद्धा पाठवत नाहीत. अशा गोष्टी घडू लागल्या की ही भगवंताची कृपा समजून आपण त्यांच्यावरील ममता सोडून वैराग्य वाढवावे व आनंद मानावा. मात्र आपले त्यांच्याविषयीचे जे अत्यंत आवश्यक कर्तव्य ते ममतारहित कर्तव्य कर्म म्हणूनच करीत रहावे. ''जैशास तैसा भेटे! तेव्हां मजलसी थाटे' असेही अधून मधून करावे.

सकाम कर्म - अनुष्ठान परमार्थेच्छूनी करू नये हे खरे असले तरी परमार्थमार्गी, रोग झाला म्हणजे औषध घेतोच ना? तसेच सकाम अनुष्ठानाचे समजावे. शरीर कार्यक्षम राहिले पाहिजे. देह जगला तरच परमार्थ साधन करता येईल. मनुष्यशरीर ईश्वरी कृपेनेच मिळते ते पुन्हा

मिळणे कठीण आणि या देहातच जन्ममरण चक्रांतून सुटण्याचा प्रयत्न सफल होऊ शकतो. मात्र सकाम कर्माचे इच्छित फळ न मिळाले तर शास्त्र आदि खोटे असे न मानता आपले देहप्रारब्ध समजून शांत राहिले पाहिजे. रामायणात सुद्धा अनेक प्रकारच्या सकाम अनुष्ठानांचा उल्लेख आहे. तसाच भागवतात सुद्धा आहे.

मुलांनी नियमांनी मातेला व पित्याला नमस्कार करावा. सर्व मुलांना स्त्रियांनी प्रथम माता, नंतर पिता व नंतर देवास सकाळ संध्याकाळ नमस्कार करण्याची सवय लावावी. त्याप्रमाणे केल्याशिवाय त्यांना खायला प्यायला काही देऊ नये. स्त्रियांनी पतीस त्यांच्यां पायावर डोके ठेवून नित्य नमस्कार करीत जावे. मुलांनी नमस्कार केल्यावर 'कल्याण होवो' असा आशीर्वाद द्यावा. आशीर्वाद न दिल्यास आयुष्य कमी होते.

जे प्रारब्धावर सोडावयास हवे ते आपण सोडत नाही आणि जे प्रयत्नांनी साध्य होण्यासारखे ते आपण साधत नाही. उदाहरणार्थ स्त्री, संपत्ती, संतति ही सर्व दैवाधीन, प्रारब्धानुसार प्राप्त होतात पण याबाबत आपण प्रयत्नांची पराकाष्ठा करतो. परमार्थ हा प्रयत्नाने साध्य होण्यासारखा आहे याबाबत मात्र आपण ''प्रारब्ध असेल तर होईल'' म्हणून प्रारब्धावर सोडतो हे बरे नाही.

चांगल्या माणसाने एखादी चूक केली तर लगेच फार गवगवा होतो पण नित्यच दुष्कर्म करणाऱ्यांबद्दल कुणी काहीच बोलत नाही. असे का? याचे उत्तर असे की पांढऱ्या शुभ्र वस्त्रावरचा लहानसा डागही उठून दिसतो. काळ्या घोंगडीवर बाटलीभर शाई जरी पालथी झाली तरी कळून येत नाही. एखाद्याचे साधन पाहून आपण तसेच करण्याचा अट्टहास धरू नये. मोर नाचतो म्हणून लांडोरीने नाचू नये. श्राद्ध वगैरे पूर्वीच्या पद्धतीने न करता एखाद्या अनाथाश्रमास देणगी वगैरे देऊन श्राद्ध साजरे करतात हे बरोबर आहे का? याचे उत्तर असे की शास्त्राधार पाळणेच योग्य. रेव्हेन्यू स्टॅम्प व पोस्टल स्टॅम्पस् केव्हां कुठले वापरावयाचे हे सरकारने ठरवून दिलेले असते. जेथे वीस पैशाचा रेव्हेन्यू स्टॅम्प हवा तेथे दोन रुपयाचा पोस्टल स्टॅम्प लावला तर चालेल का? तसेच जेथे पोस्टल स्टॅम्प हवा तेथे त्याहून अधिक किंमतीचा रेव्हेन्यू चालू शकत नाही तसेच हे समजावे.

## उपासना

**माळ न घेता केलेला जप रोजच्या जपात गणता येणार नाही. माळेने जप करतांना सगुणाचे ध्यान करता येते पण कुंडलिनी योगांतील ध्यान व माळेने जप होणे शक्य नाही.**

''संख्याहीनः जपः व्यर्थः' संख्या मोजल्याशिवाय केलेला जप व्यर्थ होय म्हणजे ते केवळ नामस्मरण होय. माळ मण्यांचीच हवी असे नाही. जप करमालेने केला तरी चालतो.

उपासना पारणे - देवाचे तीर्थ घेतले की निर्जल उपासाचे पारणे होते पण उपास मोडत नाही हे अंबरीश राजाच्या चरित्रात दुर्वास ऋषी प्रसंगात सविस्तरपणे वर्णन केले आहे. 'अशन न जलपाने होय पितांचि पाणी । अनशन हि नव्हे की —'' पाणीहि पीत नसल्यास देवाचे वा पतिचरणांचे तीर्थ घ्यावे म्हणजे दोन्ही गोष्टी साध्य होतील.

नाममंत्राचा जप **मनांतल्या मनांत** केव्हाही कशाहि स्थितीत केला तरी चालतो मात्र अपवित्र स्थितीत आडवे पडून माळेने जप करणे दोष आहे. एरवी जप उभ्याने आणि माळ घेऊन करण्यास हरकत नाही. स्त्रियांनी मासिक अडचणीच्या काळांत सुद्धां मनांतल्या मनांत जप करण्यास हरकत नाही. चवथे दिवशीं सुद्धा माळेने न करणे बरे. कुठल्याही प्रसंगी उदाहरणार्थ सोयेर (वृद्धी) वा सुतकांतहि ध्यानास बसण्यास हरकत नाही.

जप करतांना समोर सद्‌गुरूंचा किंवा इष्टदेवतेचा फोटो आपल्या डोळ्यांच्या रेषेत सरळ अशा ठिकाणी ठेवावा की त्यांच्यावर (डोळ्यांवर) प्रकाश पडेल. मग डोळे उघडे ठेवून फोटोतील डोळ्यांकडे बघत जप करावा म्हणजे झोप येणार नाही.

घराच्या बाहेर जमिनीवर मधल्या बोटाने 'राम' नाम लिहून त्याला निदान ४-५ प्रदक्षिणा रोज घालाव्यात. प्रत्येक प्रदक्षिणेने पृथ्वी प्रदक्षिणेचे पुण्य लागते अशी दृढ भावना ठेवावी. नंतर हाताच्या बोटांनी 'राम' नाम पुसून तेथील माती डोके, डोळे, कंठ व हृदयावर लावावी.

कितीहि अडचणी येवोत साधकाने सद्‌गुरूवचनावर विश्वास ठेवून त्यांनी सांगितलेल्या मार्गाने, निष्काम भावनेने, चिकाटीने व सातत्याने उपासना चालू ठेवावी.

'सद्‌गुरुहूनी देव मोठा । ज्यास वाटे तों शिष्य करंटा' तुलसी रामायणांत सुद्धा वाल्मीकिनी श्रीरामचंद्रास हेच सांगितले आहे की तुमच्यापेक्षा गुरुला अधिक मानून जे सर्वभावे सेवा करतात, भजतात त्यांच्या हृदयांत तुम्ही रहा. गुरुगीतेत शंकरांनी पार्वतीस सांगितले आहे की 'न

गुरोऽधिकं' गुरुपेक्षा अधिक श्रेष्ठ कोणी नाही. ज्यांची अशी दृढ भावना असते त्यांच्यावर भगवान कृपा करतात.

दुपारी १।। वाजता भोजन झाल्यावर अडीच वाजता ध्यानाभ्यासास बसणे हितकर ठरणार नाही. जेवण व ध्यानाभ्यासास बसणे यात निदान अडीच तासांचे अंतर असले पाहिजे. अभ्यासास बसण्यास स्नान झालेच पाहिजे असा नियम नाही. शौचमुखमार्जन करून, वस्त्र बदलून, (स्वपति मुख दर्शन वा इष्ट देवतादर्शन घेतल्यानंतर) ध्यानास बसावे. खालीलप्रमाणे सदगुरु-पद-भागीरथीत स्नान करून, मानसपूजा करून अभ्यासास पहाटेच बसावे. त्यामुळे जर सकाळी जप कमी झाला तर तो दुपारी पुरा करावा. शांत जागी बसावे. देवापुढे किंवा देवघरांत बसण्यास हरकत नाही.

श्री गुरुपादोद्भव गंगा या पडते मम मस्तकी।
तिने क्षाळिले मळास देही बाह्यांतर पूर्ण की।।
आता झालो निर्मळ पावन मी स्फटिकासम ही।
म्हणूनि कृपा भगवान मजवरी करील दयाघन ही ।।

असे भावनास्नान ध्यानात करावे.

दीक्षित बंधुभगिनींनी सुद्धा रोज एकदम अभ्यासास बसणे हितावह ठरत नाही. कारण एक तर कोणी दंभ करू लागतात नाहीतर कोणी दुसऱ्यांवर दंभाचा आरोप करू लागतात.

गुरुभक्ति, पतिभक्ति आणि प्रभूप्रेम शून्य आहे असे ज्याला वाटते ती व्यक्ति, त्या गोष्टी प्राप्त होण्यासाठी तळमळीने प्रयत्नशील बनते. ज्याला वाटते की या गोष्टी मला प्राप्त झाल्या आहेत त्याचा प्रयत्न सुटतो आणि फक्त अहंकार रहातो. शरभंग, सुतीक्ष्ण, गोस्वामी तुलसीदास असेच म्हणतात. हेच खरे दीनतेचे लक्षण आहे. अशा दीनांचा बंधु श्री रघुनाथ दीनानाथ आहे. सर्व जणांनी मनापासून नित्यनेमे साधन करावे व प्रभूला आळवावे. दीनता वाढवावी. असत्य, परदोषचर्चा, परनिंदा यांचा स्पर्शही होऊ देऊ नये.

'भाग्यवंत तुम्ही सगळ्या नारी । रामचरित मानस सुखकारी ।।
लाभे त्याचे श्रवण तुम्हांला । महाराष्ट्री दुर्लभ इतरांला ।।
पुरुषांच्या भाग्यी हे नाही । प्रपंच येतो आड तयांही ।।
रामकृपे हे भाग्य उगवते । रामकृपेवीण अति दुर्लभ ते ।।
श्रवण कथन करणे नेमाने । प्रेमाने एकाग्र मनाने ।।
खंड नका पाडूं या साधनि । राम वसे मानस रामायणिं ।।
प्रेमाचा मानस हा सागर । अधिक करील कृपा तुमच्यावर ।।
सेवा पतिला मानुनि राम । इह परमार्थि मिळे आराम ।।

प्रज्ञानाला निमित्त केला । मानस रामप्रेमी भुकेला ।।'

दोहा. **''हरिनामांला बाळगा प्रेमे सदा मुखांत ।**

**सत्य धर्म पाळा सदा लोळा परमसुखांत ।।''**

जो कर्म करतो त्यालाच त्याचे फळ भोगावे लागते. इतरांना भोगावे लागत नाही. 'हासत कर्म करावे भोगावे रडत तेचि परिणामी' हा निरपवाद नियम आहे. मनुष्य स्वतःच्या कर्मामुळे जन्मास येतो. आपण ईश्वराची लेकरे असताना चिंताग्रस्त का व्हावे? प्रभू परम दयाघन, दीनबंधू आहेत. दीन बना. अहंकार, असत्य, परनिंदा इत्यादि सोडा व प्रभूवर भार घालून त्याचे नाम नेहमी मुखाने उच्चारीत जा म्हणजे प्रभू सर्व काही योग्य तेच करतील.

वृद्ध वडील माणसांची सेवा केल्याचे बक्षिस पारमार्थिक प्रगतीचे रूपाने मिळेलच. खूप जप करा. जास्त होईल तो मांडून ठेवत जा. रामायणाची पारायणे घरीच खूप करा. काकड आरती वगैरे सर्वांनी घरोघरी करीत असावे. सर्वांवर प्रभुकृपा आहेच त्यास प्रार्थना करीत असावे.

प्रभूची मूर्ती एक क्षणभर का होईना ध्यानादिकांचे वेळी दिसणे हे परमभाग्य आहे. स्वप्नात प्रभू दिसले तरी सुद्धा त्या दर्शनाचा प्रभाव किती हे रामायणात वर्णन केले आहेच. हळूहळू दर्शनाचा काळ वाढेल. प्रभूवर अनन्यगतिक होऊन प्रेम करा म्हणजे याच जन्मात तरून जाल.

कानात घंटा, वीणा, मृदंग यांचा ध्वनी येतो हा अनुभव फार दुर्लभ आहे. त्या आवाजाकडे मन लावून स्वस्थ बसत जा म्हणजे समाधान वाढेल. दोन्ही कानात आंगठ्याजवळची बोटे घालून ध्वनि ऐकत व 'राम, राम' म्हणत बसावे म्हणजे दिव्य अनुभव येतील. कदाचित सिद्धीही मिळेल. पापी माणसास असे अलौकिक अनुभव कधी येत नाहीत. दत्तमय - किंवा प्रभुमय जग पहाण्याचा अभ्यास स्त्रियांनी आपल्या पतीपासून करावा, कुटुंबियापासून करावा. प्रयत्न करा म्हणजे प्रभुकृपेने यश येईल. योग्यतेच्या जाहिराती आणि पाट्या का लावायच्या असतात ? ज्यांचे पूर्व संस्कार फळास येतात त्यांना काही निमित्ताने काही अनुभव येतात.

नादानुसंधान व मुखाने 'राम-राम' हे भजन सारखे गुणगुणत जावे. रामाच्या फोटोतील डोळ्यांवर निरांजनाचा प्रकाश पडेल असे करून त्या डोळ्यांकडे इतर प्रकाश न ठेवता टक लावून पाणी येईपर्यंत बघण्याचा रोज अभ्यास करा म्हणजे चित्ताची एकाग्रता लवकर साधेल. भगवंतावर शुद्ध प्रेम थोडे तरी करीत रहाल तोपर्यंत तो तुम्हांला कधीच विसरणार नाही आणि अंतःकाळी तुम्हाला त्याचा विसर पडला तरी त्याला तुमचा पडणार नाही कारण तो 'तज्ञ, कृतज्ञ, अज्ञताभंजन' असा आहे. हा नियम सर्वांच्याच

बाबतीत खरा आहे.

कंप हा एक सात्विक भाव आहे. जपाच्यावेळी कंप, हुंदके येणे हेच भगवत् प्रेमाचे लक्षण आहे. अशीच साधना चालू ठेवावी. भगवंताशी नाते जोडा. त्याच्याशी प्रेमाने पण सेवाभाव न विसरता आणि तो साक्षात् परमात्मा आहे हे ध्यानात ठेवून वागत जा. म्हणजे त्याच्या कृपेचे अनुभव येतील. कुणाचीही सेवा करतांना ही साक्षात् रघुनाथाची सेवा यथाशक्ति करीत आहे ही भावना ठेवावी. कारण 'बालक सुत सम दास अमानी' प्रभूला फार प्रिय असतात. त्यास प्रभू मातेप्रमाणे जपत असतात'' प्रौढ तनयसम असणाऱ्यांवर प्रभू तेवढे प्रेम करीत नाहीत.

कुसंगतीचा त्याग करून सतत नामोच्चार आणि रामकथाचिंतन करीत राहिल्यास सर्व दुर्गुण - दोष नष्ट होतील. पण कुसंगती असेल तर ते जमणार नाही. रामकथा सांगणारा मलीन अंतःकरणाचा, अहंकारी, स्वतःस शहाणा समजणारा, कुटिल, कपटी हृदयाचा असेल तर ती कुसंगतीच! मग इतरांचे काय सांगावे?

संकटे आली की प्रभुपुढे नाक घासायचे व ती जाऊन सुस्थिती आली की ईश्वराची पर्वा करावयाची नाही हे मुळीच बरोबर नाही. हॉटेलात वाटेल त्याच्या हातचे खाणे व दत्तोपासना यांचा मेळ बसत नाही. मग गुरुचरित्र सप्ताहाचे इच्छित फळ कसे मिळणार? उपासकाच्या अशा वर्तनाने देवता उदासीन बनतात. खाद्यपेयादि मध्ये शुद्ध आचार पालन करावे म्हणजे प्रभू सर्व भार शिरांवर घेतील. गुरूचरित्रवाचन व इतर साधन नियमीत चालू ठेवावे सर्व संपत्ति आणि मिळणारा पैसा प्रभूचा आहे हे लक्षांत ठेवून वागावे. स्वतःची इच्छा अशी काहीच ठेवू नये म्हणजे प्रभू योग्य व शक्य ते सर्व करतात.

ज्याला एकदा आपला म्हटला त्याच्या कल्याणाच्या दृष्टीने कर्तव्य म्हणून कठोर लिहिणे भाग पडते. वाचून कदाचित वाईट वाटेल पण योग्य वेळी बजावण्याचे कर्तव्य केल्याशिवाय सुटका नाही. अन्यथा कलिमाहात्म्यांत वर्णन केल्याप्रमाणे दोष लागतो. 'अंध बधिर गुरू शिष्य वर्तती । एक न ऐकती एक न बघती.'

धंदा चांगला चालतो तोपर्यंत शक्य तेवढा पैसा कमी खर्च करून शिल्लक ठेवला तर अडचणीच्या वेळी चिंता उत्पन्न होणार नाही. सर्व दिवस धंद्याचे सारखे जातात असे नाही. महागाई आणखी वाढणार आहे, त्या दृष्टीने पूर्व तयारी केली पाहिजे. साधी राहणी आणि उच्च विचारसरणी ठेवून कर्म करण्यातच शांति, समाधान आहे. तरी पण गरिबांना मदत, अन्नदान इत्यादिमध्ये पैसा खर्च करणे म्हणजे पुण्यरूपी बीज पेरणे असून त्याचे फळ

सुखरूपाने मिळते.

निसर्ग सौंदर्य पहाण्याची इच्छा किंवा इतर कोणतीही नश्वर वस्तू पहाण्याची इच्छा व परमार्थ या गोष्टी दोन्ही साधणे शक्य नाही. 'प्रेम गली अति साँकडी इसमें समा न दो.' फार काय या देहापासून तो स्वतःच्या मन, संकल्प बुद्धी यांचा त्याग केल्याशिवाय त्या सर्वांपलीकडे असलेले आत्मरूप अनुभविणे शक्य नाही आणि ते अनुभविल्याशिवाय पूर्ण समाधान व सदा प्रसन्न चित्तता प्राप्त होणे शक्य नाही. दोरीवरील भासणाऱ्या दृश्यांचा (सर्प इत्यादि) निरास केल्याशिवाय दोरी जशी समोर असून, उघड्या डोळ्यांसमोर, जवळ असूनही दोरी वाटत नाही, तसेच देहबुद्धी सुद्धां जर बाधक आहे तर मग इतर गोष्टींबद्दल काय सांगावे?

'अन्नमय प्राण' असे श्रुती सांगतात. जसे अन्न असेल तसे मन बनते. न्यायार्जित धनाने मिळविलेले, शास्त्रशुद्ध रीतीने सुसंस्कृत केलेले, शास्त्रानें ज्यास शुद्ध मानले आहे असे अन्न विधिपूर्वक अग्नि, अतिथी, देवादिकांना समर्पण केलेले अन्न म्हणजे यज्ञावशिष्ट अमृत आहे. त्याने पोसले जाणारे मन सात्विकच होणार. या प्रमाणे मुळ्याची कोशिंबीर खाल्ली की ढेकरेला मुळ्याचा वास येणारच.

विषयांचा उपभोग घ्यावा तो तो अग्नीत घृताहुति टाकल्याप्रमाणे कामवासना, विषयेच्छा वाढतच जाते म्हणून तर मोठे मोठे सम्राट वैभवाचा त्याग करून वनात वानप्रस्थाश्रम स्वीकारून राहातात, समाधान मिळविण्यासाठी! ज्याला प्रसन्न करावयाचे त्याच्या इच्छेप्रमाणे वागणे, त्याला आवडते ते करणे, आणि आवडत नाही ते न करणे हे जसे कुटुंबात, तसेच समाजांत व राष्ट्रात आवश्यक आहे.

जीव कितीही समर्थ झाला तरी तो अल्पज्ञच! प्रभूची सर्वज्ञता त्यास कधीच प्राप्त होणे शक्य नाही. सती मोह प्रकरणांत सीतारूपधारिणी सतीला पाहून लक्ष्मणालाही मोह पडला. सतीचरित्र जाणण्यासाठी महेशांनी ध्यान धरून पाहिले पण सीताविरह व्याकुळ भगवंतांनी तिला लगेच जाणले.

'बडे गहे ते होत बड़ जिमि वामन कर दंड' (दोहावली) मोठ्यांचा चांगल्यांचा आश्रय मिळणे कठीण. तो ज्याला मिळतो तो मोठा होतो. जसा भगवान् वामनाच्या हातातला दंड त्रैलोक्यव्यापी झाला!

## नारीधर्म

स्त्रियांचा मुख्य देव पति. त्याच्या इच्छेप्रमाणे वागणे, त्याची अनन्यभावाने सेवा करणे इत्यादि केल्याने हरिभक्तीची प्राप्ती सहज होते. पतिसेवा ही भगवत् सेवाच आहे. बडोद्याच्या एका स्त्रीचा पति इंग्लंडला गेला

असता सुद्धा ती पतीचे पाय चेपणे, भावनेने ते प्रत्यक्ष आहेत असे समजून करीत असे. तर काही काळाने तिच्या हातास पतीच्या पायाचा स्पर्श प्रत्यक्ष होत असल्याचा अनुभव तिला येऊ लागला आणि पति लवकरच घरी परत आला.

सर्वच स्त्रियांना वाटते की आम्ही परतंत्र. पण सध्या विवाहित पुरुषांपेक्षा स्त्रियांनाच अधिक स्वातंत्र्य आहे. पतिसेवा करणाऱ्या स्त्रीला तिच्या पतीने केलेल्या पुण्याचा अर्धा वाटा मिळतो. त्याने केलेले पाप मात्र मिळत नाही. पण बायकोने केलेल्या पापाचा वाटा पतीला उचलावा लागतो. तिने केलेल्या पुण्याचा हिस्सा त्यास मिळत नाही. पण ज्याची स्त्री भगवंताची भक्ति करते त्या पुरुषावरही ईश्वरी कृपा होते, आणि त्याचे भाग्य थोर असे सद्ग्रंथ सांगतात.

स्त्रियांना एकादशी, गोकुळाष्टमी, महाशिवरात्र इतके उपास पुष्कळ झाले. श्रावण-सोमवारी सायंकाळी जेवावे. मासिक अडचण किंवा सोयेर सुतक असताही उपास मात्र केलेच पाहिजेत नाहीतर व्रतभंग होणार. दोष येणार. रामायण मात्र केव्हाही वाचण्यास हरकत नाही.

स्त्रियांनी पतीला नियमाने भगवत्‌भावाने नमस्कार करावा कोणतेही व्रत, उपवास वगैरे पतीच्या परवानगीशिवाय सुरू करण्याने स्त्रीला फार मोठी शिक्षा भोगावी लागते हे विसरू नये. पतीच्या इच्छेविरुद्ध थोडे जरी वागले तरी साधनांत विघ्ने येतात. पतिसेवापरायण पतिव्रता स्त्रीने दुसरे काहीही पारमार्थिक साधन न केले तरी ईश्वर तिच्यावर कृपा करतो आणि तिचा उद्धार करतो. घरकाम करतांनाही स्त्रियांनी नामस्मरण मात्र चालू ठेवावे. कुठलेली काम करतांना ते पतिसेवा या भावनेने करावे.

मुलांच्यावर हरिभजनाचे व आचारांचे संस्कार करणे हे मातापिता यांच्याच हाती आहे. मुले भक्तिमान, सुशील, सज्जन होतील याची काळजी घ्यावयास हवी.

विधवा स्त्रियांनी श्रीरामचरणी अनन्य प्रेम केले तर पुन्हा त्यांना जन्म घ्यावा लागणार नाही. इतकेच नव्हे तर त्या आपल्या दिवंगत पतीचा उद्धार करू शकतील. स्त्रिया पतिकुल, पितृकुल आणि मातृकुल अशा तिन्ही कुळातील ७-७ पिढ्यांचा उद्धार करू शकतात किंवा त्यांना नरकातही घालू शकतात हे जाणून त्याप्रमाणे वागावे.

स्फटिकांच्या माळाइतक्या स्वस्त मिळणार नाहीत. काचेच्या मण्यांच्या माळा अशा स्वस्त असतात त्यांनी जप करणे निषिद्ध नाही पण त्या जड असतात. त्यापेक्षा पुत्रवंतीच्या मण्यांच्या माळा सौभाग्यवती

स्त्रियांना चांगल्या. विधवांनी खऱ्या तुलसी काष्ठाच्या वापरण्यास हरकत नाही. पण दुकानात मिळणाऱ्या तुळशीच्या माळा तणतणीच्या, घाणेरीच्या लाकडांच्या असतात. बाहेर गेल्यावरही आपल्या नियमात खंड पडू देऊ नये. प्रत्येक गोष्ट थोडी तरी करावी.

## शिकवण

खरोखरच जर भाव असेल तर या स्वामींचे दर्शन स्वप्नात होऊन त्यातच एक दिवस स्पष्टपणे मंत्रोपदेश केला जाईल. निराश होऊ नये. तळमळ वाढवावी व 'सद्‌गुरू नाथ श्रीगुरुनाथ । मी अपराधी घ्या पदरांत' ह्या भजनाचा ध्यास घ्यावा म्हणजे श्रीगुरू तुमचे इच्छित पुरे करतील.

श्री. यशवंत नारायण कर्वे यांनी काय केले असता मनास शांति मिळेल असे विचारले असता दिलेले त्या प्रश्नाचे उत्तर :-

मुखी नाम हाती काम । हाचि ठेवा सदा नेम ।।
तेणे दुःख सुखावेल । रामकृपाही फावेल ।
स्नानसंध्या योग्य वेळी । मुखी नाम सर्वकाळी ।।
आदित्यासी नमस्कार । सत्य वस्तूचा विचार ।।
सत्य भाषणीं निर्धार । परद्रव्यासी माघार ।।
दृष्टी परस्त्री वमन । हेचि सौख्याचे साधन ।
ईश्वरदास म्हणे येणे । जाई खुंटुनि येणे जाणे ।।

आश्रमांतर होण्यापूर्वी श्री. रघुनाथ श्रीधर जोशी, चौक यांनी 'मी कसे वागावे म्हणजे सुख होईल असे विचारले त्याचे उत्तर -

नीति न्याय सोडू नये । स्वधर्म कर्म सोडू नये ।
धनगर्वे फुगो नये । तारुण्य मदे ।।१।।
दुजांस कष्ट देऊ नये । असत्य भाषण करू नये ।
सद्‌ग्रंथ वाचन सांडू नये । कदाकाळीं ।।२।।
देव - संतालागी झिजावे । स्त्रीचे आहारी न जावे ।
दिले वचन न मोडावे । म्हणजे धन्य ।।३।।
हाती काम मुखी नाम । ऐसा धरा दृढ नेम ।
खाणे पिणे नित्य नियम । म्हणजे धन्य ।।४।।
धन दारा गृह सुत । जन्मोजन्मी होत जात ।
परी अलभ्य नरतनु प्राप्त । तिचे सार्थक करावे ।।५।।
दिसते ते देव मानावे । मग कोणासी भांडावे ।
प्रारब्धानुसार आघवे । भोगणे घडे ।।६।।
आपुलेचि कर्म दुर्बळ । तेथे इतरां काय बोल ।

हे जाणोनि मेघनीळ । आपुलासा करावा ।।७।।
नियम निष्ठा सत्य भाषण । जप तप देवार्चन ।
इत्यादि योगे तो दयाघन । आपुलासा करावा ।।८।।
रात्री आसनी बैसावे । तेथे देवासी आळवावे ।
त्याच्या करुणेसी भाकावे । सुदीनपणे ।।९।।
अनन्यभावे करिता प्रार्थना । देव निष्ठुर होईना ।
ऐसा आहे तयांचे जना । अनुभव प्राप्त ।।१०।।
परस्त्री आणि परधन । विषाहूनि मानावी शतगुण ।
विषाने एकदाचि मरण । यांनी येई पुनः पुन्हां ।।१।।
शोधावे आपुले अवगुण । पहावे दुसऱ्यांचे गुण ।
अवगुण सोडोनि घ्यावे गुण । म्हणजे धन्य ।।१२।।
बहुत काय सांगावे । राम नाम जपत जावे ।
स्वधर्म कर्म न त्यागावे । हेचि सार ।।१३।।
हे नव्हती माझे बोल । बोलविता कौसल्याबाळ ।
ज्याचे स्मरणे पळे काळ । घाली माळ अमरत्व ।।१४।।

श्री. श्रीनिवास गोपाळ पै - परंडा, यांच्या 'क्रोध कसा घालवावा' या प्रश्नाचे उत्तर :-

\- १ -

क्रोध येतो तो कोणाला । कोणावरी घाली घाला ।।१।।
क्रोध येण्या हेतु काय । करी शोधूनि उपाय ।।२।।
क्रोधाचे कारण एक देहबुद्धी । अवघ्याचि उपाधी जेणे होती ।।
बुद्धींद्रिये मन । क्रोधा जन्मस्थान ।
नव्हेसी तू जाण । सत्य शोधी ।।३।।
प्रज्ञा वासुदेव सांगे तूं आपला । शोध घे क्रोधाला नुरे ठाव ।।४।।

\- २ -

विटाळाचा झाला विष्ठेत वाढला । मळमूत्रांनी व्यापला तो हा देह ।।
कुच्श्थळ हा देह, निंद्य निःसंदेह । तेथे ऐक्य होई क्रोधा लागी ।।
मनासि जै भ्रम देहावरी प्रेम । आपुलाचि काम गोड वाटे ।।
मनाचे विरुद्ध यदा काही घडे । समाधान मोडे क्रोध तेव्हा ।।
मनाचिया नादी जे कोणी लागले । त्यांचे सुख गेले देशोधडी ।।
मना वाटे माझे सर्वांनी ऐकावे । अन्यथा स्वभावे क्रोध करी ।।
मनाचिया मागे न जावे आपण । पावूनिया शीण शांत होय ।।
सद्गुरुचे रूप सर्वत्र पहावे । सर्वांसी नमावे प्रेम भावे ।।
मग क्रोध पळे सह परिवार । जरी दुर्निवार साधनाने ।।

सद्‌गुरु भजने क्रोधासी जिंकणे । वायांचि साधने श्रम होती ।।
मनाचे जे मूळ संकल्प केवळ । खणूनि समूळ काढी आशा ।।

श्री. ग. वि. जोशी, ठाकुरद्वार यांना लिहिलेल्या पत्रांतील उतारा :-

वैराग्येवीण ज्ञान । ते श्वानाचे रुदन ।
ऐकणाराचे अकल्याण । तेथे वसे ।।१।।
वैराग्येवीण योग । तो जाणावा रोग ।
तेणे हा भव निदाध । शांत नोहे ।।२।।
वैराग्येवीण कर्म । भूसे भारले व्याघ्रचर्म ।
ते देईना निजशर्म । चित्तशुद्धीज ।।३।।
वैराग्येवीण भक्ति । ती दांभिकाची युक्ति ।
तेणे काही जीवन्मुक्ति । लाभ नोहे ।।४।।
वैराग्याग्नी धडधडे । माजी भक्तिज्ञान योगादि पडे ।
तरीच तयांस रंग चढे । स्वरूप सुखाचा ।।५।।
मनुष्य देहांत पुरूष जन्म । त्यांत ब्राह्मण उच्च परम ।
वरी अव्यंग इंद्रियग्राम । पूर्व पुण्ये मिळाले ।।६।।
तेथे परमार्थी आवडी । विमल गुरुकृपेची जोडी ।
दिधली हे न थोडी । कृपा रामाची ।।७।।
इतुकेही मिळाले । कुटुंब अनुकुल झाले ।
पुत्रही कर्ते पाहिले । निज नयनी ।।८।।
इतुके सर्व साधता । जो न साधी परम हिता ।
तो आत्मघातकी म्हणता । चूक नाही ।।९।।
तरी ऐसे नसावे । की सर्व अशाश्वत जाणावे ।
आणि तेथेचि आसक्त व्हावे । दीपि पतंगासम ।।१०।।
हे काय शोभे विचक्षणा गारगोट्या रत्नपारखी जाणा ।
जमविता तो शहाणा । कोण म्हणे ।।१।।
नर देहा ऐसे रत्न । पूर्व भाग्ये लाभले महान ।
विषय कांचासाठी यत्न । करणे ही कृतघ्नता ।।१२।।
देहसुख लाभ । घडे प्रारब्धानुसार भोग ।
परी परमार्थी यत्नचि सांग । फळदायी होय ।।१३।।
सुधाघट आहे पुढे । आळशासी तो न जोडे ।
जो धावुनी घेई कोडे । तयासी साच अमरत्व ।।१४।।
जो नेणीवे माजी दडे । तो अहंकारा न सापडे ।
जाणीव जो बडबडे । तो रीता होय ।।१५।।

श्री. श्रीनिवास पै यांचे पत्रास उत्तर -

जीते असती बहु पती । तीस व्यभिचारिणी म्हणती ।
व्यभिचारे काही उत्तम गती । प्राप्त नाही ।।१।।
ज्याते असती बहु धनी । तो निष्ठाहीन प्राणी ।
तया सद्गुरू मोक्षदानी । वोळेल कैसा ।।२।।
अनेकांच्या बोली लागला । समाधान कैचे त्याला ।
श्वानवत् वर्तती तयाला । सौख्य नोहे ।।३।।
आम्हांपासी नाही ज्ञान । नाही आम्हांसी विज्ञान ।
नाही ग्रंथराज पारायण । त्रयोदशोत्तर शत ।।४।।
ऐसे आम्ही साधनहीन । उरलो केवळ अकिंचन ।
आम्हांपासी समाधान । इतरांस कैचे ।।५।।
स्वामी राम दयाघन । नाम त्याचे पतितपावन ।
तेणे आमुचे समाधान । सद्गुरू कृपा ।।६।।
अचिंत्य मायेचे विंदान । भल्या भल्या भुलवी जाण ।
भलत्याच मार्गी ओढून । वेढा लावी साधका ।।७।।
परमार्थाचे मुख्य वर्म । चुकवोनी लावी लौकिक धर्म ।
तेणे सुख शाश्वत परम । सुदूर राहे ।।८।।
एक देव, एक गुरु । एक मंत्री निष्ठा थोरू ।
एक मार्ग एक विचारू । तोचि धन्य ।।९।।
कल्याण स्वामींचे चरित्र । अवलोकावे परम पवित्र ।
तेथे साधन मुख्य परत्र । विदित होय ।।१०।।
दासबोध सावकाश । पाहिले दोनशे समास ।
तेणे विशेष आणि अविशेष । कळो आले ।।११।।
पारायणांचा हव्यास । नाहीच उपजला मनास ।
करिता करिता विवरणास । शान्तिलाभ गुरूकृपे ।।१२।।
गुरुकृपेवीण साधन । ते प्रेताचे भूषण ।
किंवा विधवेचे सौंदर्य जाण । जैसे व्यर्थ होय ।।१३।।
सद्गुरू वचन पालन । विषयी वैराग्य अभ्यसन ।
हेचि मुख्य साधन । नामस्मरण युक्त ।।१४।।

श्री. श्रीनिवास पै यांना पाठविलेल्या पत्रातील उतारा :-

क्षणाचा नाही भरवसा । तेथे इतुका विश्वास कायसा ।
याच देही समाधान ठसा । प्राप्त करणे ।।१।।
पुन्हा लाभेल नरजन्म । हे कोणी सांगितले वर्म ।

जन्माशा करणे महाभ्रम । गेलाचि नाही ।।२।।
जन्मा येणे शुभ संकल्प । म्हणती तो पामर जल्प ।
तयांसी वर्म अल्प । कळलेचि नाही ।।३।।
मी आत्मा सच्चिदानंद । मी जीव नव्हे अल्पज्ञ।
यासीच शुभ संकल्पाभिधान । इतर सर्वहि अशुभ ते ।।४।।
आधीच विषय संकल्पे मिथ्या बांधिला ।
त्यावरी जन्माचा इसार दिधला ।
तो प्राणी माया बंधनाला । तोडील कैचा ।।५।।
मी आत्मा स्वयें आपण । मज नाही जन्म मरण ।
ऐसा संकल्प विचक्षण । विवेके करिती ।।६।।
येचि क्षणी मरोनि जासी । तरी रघुनाथासी अंतरलासी ।
तरी नाना बुद्धि भेदासी । बळी पडोच नये ।।७।।
सोडावी विषयांची आशा । मनी धरावा वैराग्य धिंवसा ।
'मी माझं' या पाशां । झुगारूनि देणे ।।८।।
पुढील जन्माची आशा करणे । ही नव्हेत मुमुक्षु लक्षणे ।
विषय लंपट असेल तेणे । आशा ऐसी धरावी ।।९।।
प्रेमळ जे कां माउली । तुडवील कीं बालकां पायांतळी ।
सदा कृपेची साऊली । हा तो मातृधर्म ।।१०।।
कदाचित कुपुत्र जन्मती । माता कुमाता कधींच नव्हती ।
ऐसी असे आचार्य उक्ति । देवस्तोत्री ।।११।।
तुम्हा इतुकेचि विनवणें । जन्म दुराशा कधी न धरणे ।
विवेक वैराग्ये देहीच तरणे । गुरू कृपे भवसागर ।।१२।।
मी जीव मजबंधन । मज आहे जन्ममरण ।
याचि संकल्पे अज्ञान । नसतेचि बाधी ।।१३।।
मी ब्रह्म हाही संकल्प एक । स्वरूपी होतसे बाधक ।
तेथे पुन्हा जन्माचा विवेक । साहेल कैचा ।।१४।।
नित्य कर्म संपादिल्या उपरीं । फावलाही अवसर जरी ।
नामजपाची कांस धरी । एकाग्र चित्ते ।।१५।।
जरी काया वाचा मन । केलेसे गुरुपदी अर्पण ।
तरी संकल्प कराया दुजे मन । कोठूनि आणले ।।१६।।
तरी ऐसे न करावे । मन खरेचि गुरूसी अर्पावे ।
मग करणे न करणे पहावे । स्वतंत्रता कोठे ।।१७।।
नको आम्हां तुझे तनु धन । केवळ एक द्यावे मन ।
मग समाधान करी वंदन । चरणी तुझ्या ।।१८।।

असो कायसी बहु बोली । राम अनाथांची साउली ।
तीच तुम्हां आम्हां पावली । त्याच्याच कृपे ।।१९।।
विषय संकल्प वन्ही पेटला । तेणे परमार्थ जाळुनि भस्म केला ।
तरी ज्ञान वैराग्य जला । सत्वर ओतावे ।।२०।।
संकल्प वन्ही शांत झाला । तयाचा भवसागर सुकला ।
देहीच तो मुक्त झाला । बंधमोक्षातीत ।।२१।।
सदा असावे सावधान । तुटो नेदावे अनुसंधान ।
मग मायेचा बाजार जाण । असतचि नसे ।।२२।।

देहाचा भरवसा नाही । नरदेह पुन्हा नसे ।
साध्य ते येथ साधावे । आयु हे क्षीण होतसे ।।१।।
मी पण सांडुनि साधन, निष्ठेने जो करील तो धन्य ।
मी पण अधोगतिला नेते, जरि होत पंडित मन्य ।।२।।
मी पण शस्त्रे न तुटे, मी पण विपत्तिने न ते जाते ।
वैराग्य ज्ञानाने, मनन निदिध्यासने उरेना ते ।।३।।
नाते रघुनाथ पदी, सर्वहि जोडूनि लौकिका सोडा ।
रामकृपेने सत्वर, मायेचा मिथ्य तो तुटे खोडा ।।४।।
कपट दंभ पाषंडा, लपवा छपवीस मान बहु झाला ।
सरळपणा तो दुर्मिळ, अनीतिला ऊत हा किती आला ।।५।।
कलीयुग सोटा मोठा, आहे जोरांत देइ जरी बाधा ।
तैशात राहुनिया, जागे होऊनि आत्महित साधा ।।६।।
ब्राह्मण मी, साधक मी, सिद्ध महा देवभक्त, गुरुभक्त
ज्ञानी मी मुक्तही मी, मी पण हे जन्ममूळ की फक्त ।।७।।

- ॐ तत्सत -

श्री. ग. वि. जोशी यांच्या पत्रातील उतारा -

देहाचा भरवंसा नाही । नरदेह पुन्हां नसे ।
साध्य ते शीघ्र साधावे । कोणीहि आपुला नसे ।।१।।
अर्पिता देह देवाचा । चिंता त्या सर्वहि असे ।
तयासी सख्य जोडावे । सौख्य तेणेचि होतसे ।।२।।
नाथ भागवताध्याय । तेविसावा पुनः पुनः ।
वाचावा एकचित्ताने । समाधान मिळे मना ।।३।।
चित्ती ठेवोनि द्रव्याशा । करी व्याख्यान कीर्तने ।
वेश्या - सौंदर्य ते जाणा । ऐकती ते न शाहणे ।।४।।

विधवा कुंकवा लावी । घाली सौंदर्य - भूषणे

मिरवे जरी तोऱ्याने । तियेच्या हानि दर्शने ।।५।।
ठेविति चित्ति जन्माशा । मुमुक्षत्व तिथे नसे ।
सर्वही त्यागिती आशा । मोक्ष तेव्हाचि होतसे ।।६।।
मी कर्ता वा नसे भोक्ता । मायेचा खेळ सर्व हा ।
जन्म मृत्यु मला नाही । ऐशा बोधे सदा रहा ।।७।।
ज्ञान अज्ञान या दोन्ही । बुद्धि वृत्तीच जाणणे ।
अहंता त्रिविधा सोडा । स्वरूपि शुद्ध राहणे ।।८।।
सोडावा संग चित्ताने । तोडावा बंध कल्पना ।
दृश्य वा चिंत्य ते मिथ्या । करणे या चि चिंतना ।।९।।
सर्व सांडोनि जे राहे । राम तो जगी पाहणे ।
मिथ्या प्रारब्धी मिथ्या ते । सोडूनि स्वस्थ राहणे ।।१०।।
बहु ते काय बोलावे । बोलाने बोलतां नये ।
बोलाविण कळेना की । कळता खूण निर्भय ।।११।।
निर्भया अभयत्वासी । निर्मळा शुद्ध अर्पणे ।
जन्मतो हि अजन्म्याच्या । युक्तिने शीघ्र नासणे ।।१२।।
करणे नाश मायेचा । मायेने नान्य साधने ।
मनाने मन जिंकावे । काटा काटेचि काढणे ।।१३।।
शस्त्राने शस्त्र तोडावे । विषाने विष मारणे ।
कल्पने कल्पना तोडा । तरी विश्राम जोडणे ।।१४।।
जग हे सत्य की मिथ्या । कोण मी देव कोण रे ।
माझा संबंध त्याच्याशी । काय हे जाण तू त्वरे ।।१५।।
जन्मे कोण मरे कोण । कोण खातो पितो तरी ।
जागे कोण निजे कोण । कोण भोगी क्रिया करी ।।१६।।
नामरूपादि कोणाचे । ज्ञानाज्ञान कुणा घडे ।
माझा संबंध देहाशी । पाहणे की कसा घडे ।।१७।।
नदीच्या उगमा जाता । प्रवाहा अंत की घडे ।
ओघानेचि पुढे जाता । सागरि जाउनि पडे ।।१८।।
हळूहळू वरी जाता । प्रवाहा लघुता दिसे ।
दिशेने त्याचिया जाता । घोर गंभीर होतसे ।।१९।।
प्रवाही वाहणे सोपे । उलटे जाणे कठीण ते ।
सर्वदा साधनाभ्यासे । पुरुषार्थेचि साधते ।।२०।।

अल्पही जड वस्तूला । जो कोणी घेई संगती ।
पोहता उलटे त्याला । नेतसे ती अधोगती ।।२१।।
अहंता फार मोठा हा । धोंडा बा बुडवी जळी ।
संतांचा संग हा पेठा । घेउनि जातसे मुळी ।।२।।
नदी मुळासी जो गेला । तयाचा ओघ भंगला ।
वासुदेव कृपा योगे । सौख्ये प्रज्ञान रंगला ।।२३।।

- १ -

चिंता सर्व वाहे राम । कपटाचे काय काम ।
पूर्वी कधी केले नाही । आता कैसे घडे काही ।
जरी ठाके प्राणनाश । कैसे सोडावे सत्यास ।
हानि लाभ ही अनित्य । धर्मपालन हे नित्य ।
प्रज्ञा आकाश कोसळे । धर्म राखू राम बळे ।

- २ -

जगी सुख दुःख दाता । कोणी नाही चित्ता परता ।
ते तो रामी झाले रत । कैसे पाप आचरत ।
सुख दुःख मन भावी । करी नाना उठाठेवी ।
आज जया मानी सुख । काळे तया मानी दुःख ।
सुख दुःख अशाश्वत । मन कल्पना अद्भुत ।
प्रज्ञा म्हणे मनामागे । आत्मघातकी तो लागे ।

- ३ -

मायेचेनि योगे राम खेळ करी । तयासी आवरी कोण केवी ।
अनंत ब्रह्मांडे रची उतरंडी । क्षणामाजी पाडी मायादेवी ।
वाईट की बरा होतो जो खेळ । रामाची केवळ इच्छा तैसी ।
बरेही जन्मते वाईटाचे पोटी । खेळे उफराटी माया खेळ ।
प्रज्ञा ऋजुतेसी सोडीना कदापि । राम नाम मापी क्षणोक्षणा ।

- ३ -

कर्माते जो करी तोचि भोगि फळ।
ऐसा हा अढळ मार्ग आहे ।।
एकाचे कर्मासी भोगीना दुसरा ।
कलियुगी खरा नेम जाणा ।।
विषवृक्षा येती विषाचीच फळे ।
आम्रासी रसाळ मधुतुल्य ।।
कर्मविपाकाचा अटळ सिद्धान्त ।
जाणोनि निवांत स्थिर राहू ।।

प्रज्ञा उदासीन राहे सर्वकाळ ।
वाहतो कृपाळ राम भार ।।

- ॐ तत्सत् -

याच देही पावेन समाधान । गुरु बोधे जाईल दुरभिमान ।
जया जन्माचा तिरस्कार आला । मुख्य अमुचे सांगणे हे तयाला।।१।।
जयां वाटे निःशेष रोग जावा । भिषग्वाक्यीं विश्वास दृढ धरावा।।२।।
पथ्य पाळणी जरी यत्न तो न व्हावा । शुद्ध सौख्याचा लाभ कसा पावा।।३।।
आत्मश्विासे यत्न करी सांग । तया होतो साह्य तो राम चांग ।
इये जन्माचे फिटती तदा पांग । चित्त निर्मळ जळ जेवि शरदि गांग।।४।।

समस्तासि जाणे असे एक ठायी ।
जरी कोणि चालेल की मंदपायी ।
तरी पोचणे याच देही न होई।
पुन्हा ही तनु प्राप्त होईल काई ।।४।।
मनीं संशय नांदतो अल्प जेव्हां ।
उठे साधनीं देह बाधाचि तेव्हां ।
तया सांडूनी जो धरी निश्चया ते ।
तरी इंद्रियांच्या करी तो जया ते ।।५।।
मनाला जीवानेच सोकावले रे ।
म्हणोनीच भोगांत डोकावले रे ।
तया इंद्रियी जोम फोफावले रे ।
तदा चित्ती ना सौख्य एकावले रे ।।६।।
परी जीव जो जाहला नारी-बुद्धी ।
कसा कोण मी राहिली त्या न शुद्धी ।
म्हणोनि हरे तो सदा भोगयुद्धी ।
कधी रंगतो ना सुखी त्या विशुद्धी ।।७।।
मनें भोग दोषासि बुद्धीस सांगा ।
तरी ती करी की जीवालागी जागा ।
तदा सोडितो सर्व बाह्यानुरागा ।
सुविज्ञान पावेल तेवी विरागा ।।८।।

रामाचे दरबारी नारी नर सान थोर भेद नसे ।
प्रारब्धे घडती की योग वियोगादि इष्ट नेष्ट तसे ।।१।।
भाव जयाचा जैसा तैसा हरी निकट दूर वा राहे ।

राघव सन्निध असतां, चित्ती खेदा न योग्य जागा हे ।।२।।
देहावरी प्रेम जरी करावे, शोके तरी चित्त तदा भरावे ।
आत्म्यावरी प्रेम विशुद्ध राहे, तेथे कधी खेद नसे स्मरावे ।।३।।
आत्मी स्त्रियांची ही आत्मा नरांचा । नाही असा भेद कधीहि साचा ।
आत्मा कधी तो नसतोचि दूर । जाणा करा चित्त तिथेचि चूर ।।४।।
जे जे घडे ते रघुवीर योजी । जाणोनि होणे ही तयांत राजी ।
धाडी जरी दुःख शतांसि राम । दासासी वाटे तरी सौख्यधाम ।।५।।

**- नित्य चिंतनार्थ सुबोध बचने -**

माया म्हणजे स्व-कल्पना । माया विजयाच गणा।
माया केवळ मने भ्रम । देह बुद्धीचा परिणाम ।।१।।
देह बुद्धि हाच बघ बंध । आत्मबुद्धि मोक्षचि सिद्ध ।
विषय विरतिचे धरणे पाय । जाणा माया तरणोपाय ।।२।।
विषयी सर्वदा दोष पहा । विरति लाभ मग सहज महा ।
विषयी दोनचि दुष्ट महा । जिव्हा आणि शिस्न पहा ।।३।।
जगती काही जे दिसते । सर्व जाणणे नश्वर ते ।
देहही अपुला हा नाही । अपुले कोण दुजे काही ।।४।।
ज्याशी ज्याशी संबंध । स्थिर वा चर रामचि शुद्ध ।
खूण अंतरी ठेवावी । शास्त्राधारे कृति व्हावी ।।५।।
सोन्यापासुनि जे झाले । सोने असते ते सगळे ।
ब्रह्मचि हे जग झाले । ब्रम्हचि केवळ शुद्ध भर्ले ।।६।।
तुम्ही तया विश्वामाजीं । ब्रह्मचि जाणुनि व्हा राजी ।
नामरूप कृति ही मिथ्या । बाकी उरले ते सत्य ।।७।।
प्रेम जगी या जे दिसते । स्वार्थमूल ते बघ असते ।
स्वार्थाविण जे प्रेम खरे । करिति संतचि ईश्वर रे ।।८।।
प्रीति हेतुवीण करा । जगावरी सुख चित्तींभरा ।
अन्य दोष ना बघा कधी । दोष बघा आपुले आधी ।।९।।
सद्गुण दुसऱ्यांचे गिरवा । अपुले सद्गुण ते लपवा ।
पतिव्रता अंगास जशी । भक्ति ज्ञानां तुम्हि तैसी ।।१०।।
विषयी नाही सुख दुःख । भ्रमे मानिती परि मूर्ख ।
सुख दुःखाचे कारण ते । जाणा अपुले मन असते ।।११।।
नाम जयाचे सदा मुखी । चित्त तयाचे सदा सुखी ।
सुबोध वचने चित्ती धरा । प्रज्ञा लाभे शांति झरा ।।१२।।

**- हरि ॐ तत्सत -**

मोहनिशेने स्वकर्म विसरूनि घोरत जो पडला ।

शब्दाने त्या जागृत करणे अवश्य मातेला ।। १ ।।
नरतनु भववारिधिची तरणी । वायु हरिकृपा सौख्य वितरिणी ।
कर्णधार गुरु योग्य लाभणे । दुर्लभ तीन तरुणपणी जमणे ।
तीन मिळुनी जो हित साधीना । आत्मघातकी तो नर जाणा ।
प्रारब्धासी सारूनि मागे । आत्महिता जो सदैव जागे ।
करि निष्ठेने नेमे साधन । विषयसुखी जो रमवी ना मन ।
प्रारब्धाचे भोग भोगणे । चुके न कोणा मनी बाळगणे ।
जरी जाहले जीवनमुक्त । तरी चुकेना भोग नियुक्त ।
निवारणे जे करीं असेना । तिथे खेद तरी कशास माना ।
सुखदुःखाते सर्व भोगणे । परि मी भोक्ता नोहे स्मरणे ।
सुखदुःखी जो समान असतो । चित्ती क्षोभ कधीही नसतो ।
कमळ दळावरी जैसे वारी । तसे भोग ही द्विविध शरीरी ।
स्वयें राम जो आत्मा आपण । तेथे नाही कर्तृभोक्तृपण ।।
चित्त समत्वा अल्प न त्यजितो । मायेचा हा खेळ पहातो ।
नाम सुधारस पाना करितो । सद्‌गुरुवचना चित्ती धरितो ।
रामरूप हे विश्व पहातो । संकटी निश्चय जरा न ढळतो ।
स्तुति वा निंदा समान गणितो । अनासक्तीने कार्या करतो ।
रघुपति त्याचा रक्षक बनतो । भवांबुधीचे नाव नुरवितो ।
सौख्य सागरी मानस मीन । विहार करितो स्वरूप लीन ।
सर्व करूनि तो काही न करितो । शाश्वत शांतिला तो वरतो ।
पराधीनता तीच म्हणावी । चित्ते विषयी रति मानावी ।
वश असती इंद्रिये सदैव । मनासहित तो पुरुष सदैव ।
पराधीनता तो देहे दिसला । स्वतंत्र तरी तो खरा जाहला ।
देहाने जो दिसे स्वतंत्र । चित्ताने जरि तो परतंत्र ।
तो परतंत्रचि पुरा म्हणावा । विषय गुणांनी बद्ध म्हणावा ।
आत्मतंत्र जो स्वतंत्र तोचि । कर्मतंत्र परतंत्र खरा की ।
स्वतंत्र आहे आत्मा नित्य । मनी बाळगा हे दृढ सत्य ।
कर्माने स्थिती येता भलती । धीर पुरुष ते कधी न चळती ।
जे येते तें काळे जाते । हर्ष शोक न च तरी चित्ताते ।
त्रिगुणी दैवी माया दुस्तर । हरीभजनाने तरणे सत्वर ।
पंचयज्ञ, संध्या जप मानस । पूजाध्यानी धरी न आळस ।
जे घडते ते करी रामार्पण । तरीच होते धन्य मनुजपण ।
भूतदया पितरांची सेवा । सत्य भाषणी निष्ठा ठेवा ।
नियम पालनी तप्तर राही । भवभीतिच त्या नुरे जराही ।

- ॐ तत्सत् -

रामनाम दुग्ध सुधा तुल्य लाभले । रामभक्ति तूप पहा तिथे प्रकटले ।
विश्व रामरूप चित्त नित्य पाहते । प्राप्त भोग हर्ष शोक रहित भोगते ।
प्रारब्धे जे मिळे यदृच्छे त्यांत समाधान ।
चित्त मानिते न्युनत्वाचे कधी नसे भान ।
कर्माने तनु जिकडे जाते पुढती ते तिकडे ।
तयार असता द्रव्याची मग काय जरूर पडे ।
नश्वर जड या देहाची तुम्ही चिंता का करिता ।
स्वरुपि निश्चल भक्ति पावूनि हित साधा त्वरिता ।
इतुके साधा तुम्ही तरी हो स्वामीची सेवा ।
सांग जाहली पूर्ण सर्वही हे गुज मनी ठेवा ।।
घडे न हे जरी करूनी सेवा काही नच घडली ।
व्यर्थ तयांने निजजननीला जन्में कष्टविली ।।
एकांती स्थिर बसुनी चित्तें द्रवित देवराया ।
करा प्रार्थना करुणा वचनें हरिल अंतराया ।।
खरी दीनता तळमळ हृदयी राम यदा पाहे ।
सभाग्य त्या पुरुषाचे रघुवर न्यून न कधी साहे ।।
पाउल एक जरी हरिमार्गी मनुजे टाकावे ।
दोन पाउलें तरी दयाळे रामें धावावे ।।
स्वभाव ऐसा सीता पतिचा आहे कनवाळू ।
परि पहातो अल्प परीक्षा प्रेमे जनपाळू ।।
सकाम भक्तांचेही पुरवितो लळे अनन्यत्वें ।
निष्कामासी काय उपेक्षी भक्त वत्सलत्वें ।।
दूर नसे तो सन्निध आहे अतीव भक्तसखा ।
परि पाहिजे अनन्यभक्ति चरणी दृढ एका ।।
काही तयाला अन्य नसे प्रिय शुद्ध हृदय भक्ति ।
तोचि अर्पितो ज्ञान विरक्ति किती वदू उक्ति ।।
भार तयावरि सर्व घालुनि स्मरा तया प्रेमे ।
सत्य सत्य हे वचन जाणुनी अळवा त्या नेमें ।।
प्रज्ञानाच्या अनुभव बोला । हदयी खोल धरा ।
कदा न आटे तदा पाहणे । शान्तिचा ही झरा ।।

- हरि ॐ तत्सत् -

रा. रा. ग. गो. कारखानीस विजापूर यांस पाठविलेले 'हा कोणता शून्यवाद' याचे उत्तर - "हा शून्यवाद नसून अकर्तृत्ववाद आहे."

ज्या चित्ति कर्तृत्वाभिमान । कर्मी जोडले माझे पण ।
तेथे करूनि करणे अर्पण । योग्यचि हे ।।१।।
परि कर्मा असति पांच कारण । तेथे कर्माचे कर्तेपण ।
एकाचेनि मानणे जाण । योग्य नव्हे ।।२।।
प्रथम ते अधिष्ठान । दुजे ते कर्ता जाण ।
पुढे चेष्टा आणि करण । दैव ते पांचवे ।।३।।
चित्ताने हे अनुभविता । अंतरी नुरे कर्मकर्तृता ।
ऐसी सहज स्थिती होता । अर्पण कैसा करी ।।४।।
जरी करेल अर्पण । तरी उरेल अर्पणाभिमान ।
म्हणोनि न करिता अर्पण । झाले पाहिजे ।।५।।
कोणी एक करी लाडू । होत गोड अथवा कडू ।
तेथे म्हणे कोणी धोंडू । दगडू तुला हे अर्पण ।।६।।
सर्व कर्ता एक राम । ऐसा जो निश्चय ठाम ।
तेथे अर्पणाचा संभ्रम । वायाचि की ।।७।।
म्हणाल उसने आणिले । त्याचे त्यास समर्पिले।
यात कोठे बिघडले । तरी ऐका सावध ।।८।।
उसने आणिले वाटले । तेचि कर्तृत्व पाठी लागले ।
जेथे कर्तृत्वचि गेले । तेथे कैचे अर्पण ।।९।।
एक मी अर्पिता । ईश्वर दान घेता ।
या भेदाची मग वार्ता । जेथे नाही ।।१०।।
तेथे प्रारब्धे जे घडे । ते न घेतां आपणाकडे ।
सहज होते रोकडे । फळ स्वयें अर्पण ।।१।।
जैसा की वेणुवनी । वायु घर्षणे पेटला अग्नी ।
तयाचे अर्पणी । अधिकार कोण ।।१२।।
येथे शून्य म्हणिजे अव्यक्त । जे मनादिका नव्हे व्यक्त ।
जे केवळ सन्मात्र । ब्रह्मचि ते ।।१३।।
आकाशासहि म्हणती शून्य । आकाश म्हणजे अवकाश शून्य ।
समर्थ वदले जगमान्य । परी ते हे नव्हे ।।१४।।
श्रीमत् भागवती । प्रसिद्ध जी वेदस्तुती ।
श्लोक एकोन त्रिशंति । 'शून्य' उल्लेख पहावा ।।१५।।
'शून्य' म्हणजे शून्यासम । जेवि आकाश नव्हे ज्ञानगम्य ।
तैसे जे परब्रम्ह । होय तयांत अर्पण ।।१६।।
जैसे ते सागरजळ । त्याचेचि झाले मेघमंडळ ।
भूमी वर्षे येता काळ । नदी माजी वाहते ।।१७।।

पुनरपि गेले सागरी । अर्पणा कोण अधिकारी ।
तैसाच हा विवेक चतुरी । गुरु खुणेने जाणावा ।।१८।।
याहूनी परता योग कैंचा । नसे दुजा तोलाचा ।
म्हणोनि म्हणणे 'धुरेचा' । सार्थचि ते ।।१९।।
ब्रह्मार्पण ब्रह्म हवि । हेही तोवरीच उठाठेवी ।
जोंवर कर्तृत्व पदवी । गेली नाही ।।२०।।
नाथ भागवती द्वितीया ध्यायी । 'कायेन वाचा' टीकेठायी ।
दाखविली असे सोयी । अर्पण होण्याची ।।२१।।
नाही ज्ञानेश्वरी अभ्यास । नाही प्रस्थानत्रयी वास ।
रघुनाथे बोलविले वाचेस । हस्तांनी केले लेखन ।।२२।।
''नैव किंचित्करोमिती'' । 'इंद्रियाणीन्द्रियार्थेषु' वदती ।
'गुणा गुणेषु' वर्तन्ते म्हणती । रहस्य अवलोकावे ।।२३।।
रुचेल तरी हे घ्यावे । ना तरी सुखे त्यागावे ।
किंवा प्रसिद्ध करावे । प्रत्यवाय नसे ।।२४।।

**- हरिः ॐ तत्सत् -**

प्रभूचे भजन हेंच एक सत्य । स्वप्ने जग मिथ्य भुलू नका ।।

भजन नेमाने प्रेमाने रोज करीत जा. त्यात चुकू नका. लाजू नका आशुतोष शंकरांचे भजन रोज करा. भक्तांच्या आकांक्षा पूर्ण करून ते प्रेमभक्तीचा लाभ देतील. रोज अर्धा तास तरी भजन करावे. भजनात हृदय भरून येऊन अश्रु व कंठावरोध होतो हेच प्रेमभक्तिचे लक्षण आहे. श्रीसद्गुरूंची कृपा सर्वांवर सारखीच असते. गुरु माऊलीजवळ दृश्य, अदृश्य असे जे काही असेल ते ज्या ज्या पात्रात जेवढे रहाण्यासारखे असेल तसे ते वाढले जाते. साधन नियमाने करावे. आळस करू नये. 'अभाग्याच्या घरी बाबा । कामधेनु आली । ओढाळ म्हणोनि तेणे हाकलून दिली' असे होऊ देऊ नये. स्वप्नात दर्शन झाले की अनुग्रह करण्याची प्रार्थना करावी. म्हणजे तुमची इच्छा प्रभू पूर्ण करतील. स्वामी केवळ निमित्त मात्र; दगडाला शेंदूर फासून प्रभूनी केलेला देव आहे. सूत्रचालक प्रभूच आहेत.

वाईटातून चांगले काढून भगवत् भजन अनन्यगतिक बनून प्रेमाने आणि निष्ठेने करा म्हणजे समाधान वाढेल. सद्गुरु कृपा झाल्यावर आपल्या प्रगतिबद्दल साशंक असू नये. न्यूनगंड काढून टाकावा. इतर गुरुबंधूंची प्रगती विशेष दिसल्यास मत्सर करू नये. प्रत्येकाची प्रगती आपापल्या परीने चालू असते. अव्यंग मनुष्य देह मिळणे अति दुर्लभ हे लक्षांत ठेवून त्याचे सार्थक करा. परनिंदक, अहंकारी इत्यादींची संगति टाळा. कुसंगतीचा परिणाम सुसंगतीपेक्षा लवकर होतो. सत्संगतीचा भरपूर फायदा घ्या.

प्रत्येकाच्या भावनेचे फळ प्रभू त्याच्या पदरात टाकतात. इच्छा व तळमळ हवी. स्थानाचे माहात्म्य असतेच. शांत, पवित्र स्थान असल्यावर सात्विक समाधान लाभून मन जसे उल्लसित होते तसे अपवित्र स्थानी होत नाही.

तुम्ही रामायणातील बरीच पापांची यादी पाठ केलेली दिसते. पण असे कोणते पाप आहे की जे भगवंताच्या नामाने आणि हरिकथेच्या प्रभावाने नष्ट होणार नाही ? जगांत आली पण गेली नाही अशी एकच गोष्ट आहे ती म्हणजे भगवंताचे नाम! साधकास सुसंगति नसली म्हणजे पूर्व संस्कार चांगले असून सुद्धा आळस जात नाही. आवड वाढत नाही आणि परमार्थाची कळकळ सुद्धा टिकत नाही.

प्रभूस पाप अर्पण करून पुण्य शिल्लक ठेवलेस हे बरोबर नाही. कारण ज्ञानेश्वर म्हणतात, ''पापात्मके पापे नरका जाईजे । पुण्यात्मके पापें स्वर्ग भोगिजे' म्हणजे येर झारा काही चुकत नाही. म्हणूनच 'यद् यद् कर्म करोमि तत् तत् अखिलं शंम्भोतवाऽ राधनम्'.

पंढरपुरांत नामदेवाच्या वेळी एक म्हातारी बाई होती. ती सर्व गोष्टी कृष्णार्पण करीत असे. केर टाकतांना सुद्धा कृष्णार्पण म्हणून टाकीत असे. पुढे पुढे पहाटेस कांकडा झाला की नामदेवाच्या डोळ्यादेखत श्री पांडुरंगाच्या तोंडावर केर पडू लागला. तेव्हा तपास करतांना कळले अमुक बाई त्यावेळी कृष्णार्पण म्हणून केर टाकते व तोच पांडुरंगाच्या मुखावर पडतो. तेव्हा नामदेवाला राग आला व ते स्वतः त्यावेळी हिंडून पाहू लागले. तिने त्या पद्धतीने केर टाकलेला पाहून तिच्या एक श्रीमुखात भडकावली. तिने म्हटले 'कृष्णार्पणमस्तु'! नामदेव येऊन पहातात तो देवांचा गाल लाल सुजलेला! अशा प्रकारे सर्वच जे कृष्णार्पण करतील त्यांनी पाप अर्पण केले तरी चालते. पण असे घडत नाही. तोपर्यंत अर्पण केलेले पाप तेथपर्यंत पोहोचू शकत नाही! ते जातच नाही देणाऱ्याला सोडून! ते म्हणते की ''मी सावत्र मुलगा म्हणून मला हाकलून देता आणि सख्खा मुलगा जवळ बाळगता तर माझाही त्याच्या बरोबरीने तुमच्याजवळ रहाण्याचा हक्क आहे. दोघांना हाकलून दिलेत तरच मी जाईन!''

संसारात पदार्पण केल्यावर यथायोग्य गृहस्थाश्रमाचे आचरण करा. विषयांध बनू नका. रामायण वाचन रोज दोन दोहे तरी करत जा. कुठलाही एक नियम करावा पण त्याचे नीट पालन करावे. परमार्थात पती पत्नीनी एकमेकास साह्य केले पाहिजे. जे कोणी सांगितल्याप्रमाणे वागतात त्यांचेच ऐहिक व पारमार्थिक कल्याण होते व तसे होते आहे असे ऐकले की या चित्ताला आनंद होतो. हाच मुख्य लाभ !

- ॐ -

पुत्राचे सहस्त्र अपराध । माता न मानी तयाचा खेद ।
हे स्वहीत घातकी वाक्य । वेदवाक्यासम पाठ केले ।।१।।
कलियुगीचे शिष्य आणि पुत्र । ग्रंथ वाचिती बहुत ।
त्यातील स्वदोषाच्छादन पात्र । वाक्यें मात्र पाठ करिति ।।२।।
श्रीदासबोध वाचन । केले असेल निरीक्षण ।
त्यात ऐसे वाक्य अवलोकन । केले काय? ।।३।।
पुत्र करू लागला चोरी । माता जाणोनिहि शिक्षा न करी ।
ती माता नव्हे लाव बरी । पुत्र हित घातकी ।।४।।
लाड करावे पांच वत्सर । ताडन करावे तदनंतर ।
ऐसा करिती गजर । धर्मशास्त्र नीतिग्रंथ ।।५।।
श्री अहिल्यादेवी धर्मशील । पाहोनि पुत्र दुःशील ।
गजपद घाते केवळ । मारवी तया ते ।।६।।
ऐसी कर्तव्य कठोरता । न धरिती तात गुरु माता ।
म्हणुनी दुःख दैन्यावस्था । भारतीया प्राप्त असे ।।७।।
ग्रंथ वचनांचा आधार । घेता वाटे गोड फार ।
परि ऐशाने स्वहित सुखसागर । प्राप्त नोहे ।।८।।
जैसे तीक्ष्ण खडा हाती । घेउनी पोरे संहार करिती ।
तैसीच ही वचने अंती । नाश करिती स्वहिताचा ।।९।।
स्वापराधावरी पांघरूण । घालावया ऐसे वचन ।
चटकन लिहिता मन । लाज न मानी जयाचे ।।१०।।
तयांस सद्गुरु चतुरानन । की भेटला स्वयें नारायण ।
तरी ते भवसागर लंघन । करू न शकती ।।११।।
गुरु करिती देखो देखी । आणि गुरु थोर म्हणुनी सेवी ।
मिरविती जे जे लोकी । आत्मघातकी ते जाणावे ।।१२।।
अस्तु ऐसे न करावे । सद्गुरु वचन पाळावे ।
इंद्रिय निग्रही धरावे । धैर्य दृढ ।।१३।।
नित्य नेम जप ध्यान । स्नानसंध्या पंच महायज्ञ ।
करोनि वाढवावे भक्तिज्ञान । वैराग्ये सहित ।।१४।।

**- हरि ॐ तत्सत् -**

# साधकबोध

## एका साधकाच्या पृच्छेवरून उत्तर :-

।। श्रीराम समर्थ ।।

**प्र.**- शत्रुत्वभावना कशी जिंकावी?

उ.- शत्रुत्वभावना नाहीशी करण्याचे (१) आधिभौतिक-व्यावहारिक (कर्म), (२) आधिदैविक (उपासना) व (३) आध्यात्मिक (ज्ञान) असे तीन मार्ग आहेत. हे सर्व सुविचाराचे व चिंतनाचे मार्ग आहेत व विचारानुसार कृती पण करता येते.

**(१) प्रथम व्यावहारिक दृष्टीने विचार करू**

**प्र.**- जो तुमच्याशी वैर करतो (असे वाटते) तो सर्व शेजाऱ्या-पाजाऱ्यांशीही वैर करतो का?

उ.- 'नाही करीत' उत्तर येणार! मग तुमच्याशीच का वैर करतो?

उ.- काही कारण नसताना करतो.

**प्र.**- कारणाशिवाय कार्य घडते का?

उ.- नाही. पण त्याने भ्रमाने, गैरसमजाने नसलेलीच गोष्ट कारण मानली आहे.

**प्र.**- तुमच्याच बाबतीत त्याने खोटे कारण का मानावे? इतरांच्या बाबतीत खोटी कारणे मानून इतरांशी त्याने वैर का करू नये?

उ.- आधिभौतिकदृष्ट्या शत्रुत्वाचे कारण 'प्रारब्ध' मानावे लागेल.

**प्र.**- प्रारब्धकर्म त्वां केलेस का त्याने?

उ.- मीच.

**प्र.**- मग त्याचे फळ तू भोगणार का तो? एकाने जेवल्याने दुसऱ्याचे पोट भरते का?

उ.- नाही. जो जेवील त्याचेच पोट भरेल.

**प्र.**- मग ज्याच्या कर्माचे फळ त्यानेच भोगले पाहिजे हे ठरले ना?

उ.- होय.

**प्र.**- हे कर्मफल देणारा कोण असावा?

उ.- ईश्वर!

**प्र.**- तो ईश्वर एखाद्या संकटातून अनपेक्षितपणे कोणाच्यातरी रूपाने तुम्हास सोडवितो तेव्हा त्या रूपधारी कोणातरी जीवाशी मित्रत्वभावना करता की नाही? त्यानी जर तुमचा त्याचा काही संबंध नसता म्हणजे विनाकारण तुम्हास सोडविले! यावरून हे पटले की, अकारण मित्रता किंवा शत्रुता कोणी

करतो त्याला आमच्या कर्माचे फळ आमच्या पदरात टाकण्यास ईश्वरानेच निमित्त केलेला असतो. म्हणून कर्मभोगातून आपणास सोडविण्यास तो निमित्त बनला हे उपकार केले की, अपकार? आम्हाला आमच्या कर्जातून सुटण्यास जो मदत करतो तो उपकार करतो की, अपकार?

उ.- उपकारच.

**प्र.**- कर्म-भोग हे कर्ज आहे, ते फेडल्याशिवाय सुटका नाही. मग कर्म-भोगाच्या एका अंशातून सोडविण्यास मदत करणारा उपकारकर्ता की अपकारकर्ता ?

उ.- उपकारकर्ता !

**प्र.**- मग हे तुम्हास समजल्यानंतर तुम्ही त्याच्याविषयी कोणती भावना ठेवावी? मित्रभावनाच ना?

उ.- होय.

**(क) साधकाचा प्र. - पण त्याच्या या मित्रत्वाच्या मदतीच्या योगाने आम्हास दुःख होते त्यास काय करावे?**

उ.- ते आपलेच पूर्वीचे ठेवणे आहे. ते आपणच भोगले पाहिजे. नफ्याला जो मालक त्यानेच तोट्यालाही मालक झाले पाहिजे.

**प्र.**- हे सर्व मान्य! पण आम्ही जशी भावना करावी-ठेवावी अशी अपेक्षा आपण करता किंवा आम्हास सांगता तीच भावना उलटपक्षी त्याने का ठेवू नये?

उ.- तुमच्या कर्माचे फळ जोपर्यंत भोक्तव्य आहे तोपर्यंत त्याला तशी इच्छा होणार नाही.

**प्र.**- मग आम्ही सुद्धा तसेच म्हटले तर काय बिघडेल?

उ.- तुम्ही वैरभाव बाळगून फार तर त्यास दुःख देऊ शकाल. पण त्यामुळे तुमचे दुःख थोडेच कमी होणार? तुमचे दुःख तुम्हास भोगलेच पाहिजे. प्रेमाने जसे प्रेम वाढते तसेच वैराने वैर वाढते. आम्ही जोपर्यंत कोणाविषयीही शत्रुभावाने विचार करीत नाही तोपर्यंत अनेकांनी केलेले वैर-संकल्प आमच्यात शिरू शकत नाहीत. आम्ही 'क्ष' विषयी शत्रुत्व भावना मनात आणली की, 'क्ष' ने केलेले शत्रुत्व-संकल्प तर आमच्यात शिरतीलच पण 'ज्ञ' अगर कोणीही केल्यास ते सर्व संकल्प आमच्यात शिरतील. म्हणून कोणाविषयी शत्रुत्व भावना उत्पन्न होऊ देऊ नयेत.

(ख) **प्र.**- अशाने व्यवहार कसा चालेल?

उ.- हा प्रश्न महत्वाचा आहे; पण जितका वाटतो तितका अडचणीचा नाही. कोणी आमच्यावर खोटी फिर्याद केली तर विरुद्ध बाजूने आम्हासही कोर्टात गेलेच पाहिजे. पण 'फिर्याद करणाराही आपला मित्रच आहे' ही

भावना आपल्या हृदयात कायम पाहिजे. असत्याचा अवलंब न करता जे योग्य कर्तव्य ते केलेच पाहिजे. भक्ताभक्तात सुद्धा युद्धे झाली आहेत. पण मनात शत्रुभाव नाही. देव-भक्तातही युद्धे झाली आहेत. (हनुमान-अर्जुन, हनुमान-गरूड, हनुमान-शंकर, शंकर-विष्णु, पांडव-कृष्णभगवान इ.) पण तेथे रणांगणावर आल्यानंतर मनात नमन व बाहेरही नमन, पायावर बाण मारून!! युद्धे क्षत्रियधर्म म्हणून झाली. भक्ती हा व्यक्तिधर्म आहे तो हृदयात ठेवून गृहस्थधर्माचे पालन गृहस्थाने केलेच पाहिजे. वरील उदाहरणावरून व्यवहारातील भूमिका कशी असावी याचे मर्म ध्यानात येईल.

(ग) **प्र.**- आम्ही जो जो वैरी वाटत असणाराविषयी मित्र भावना करीत जाऊ तो तो त्याच्या हृदयातील शत्रुभावना कमी कमी होऊन तो मित्र बनेल. तो आमचे वाईट करतो असे तोंडातून तर निघता कामा नयेच पण मनातही तो विचार येता कामा नये. लाभ-हानी आपल्या कर्मानुसार होणार व त्याला कोणी तरी निमित्त बनणार! दुःख देणाऱ्याला सुख देण्याचा प्रयत्न मनापासून गुप्त रीतीने करणे हे सदा सुखी राहण्याचे एक साधन आहे.

### (२) दुसरा मार्ग सगुणोपासकांचा

आपल्या इष्ट देव्तेवर प्रेम असणाऱ्यांना हा सोपा वाटेल. मातीपासून झालेले पदार्थ जसे मातीच असतात तसेच माझ्या प्रभूपासून झालेले सर्व जीव माझ्या प्रभूचेच रूप आहेत. 'ईश्वरांश जीव अविनाशी' जो वैर करतो असे वाटते, तो सुद्धा प्रभूच आहे. माझे कल्याण करण्यासाठी त्याने हे रूप घेतले आहे व त्याच्या इच्छेप्रमाणे तो माझ्याशी वागत आहे. तो सर्वांचा सुहृदय-हितकर्ता असल्याने 'सुहृदं सर्व भूतानां ज्ञात्वा मां शांतिमृच्छति' (भ. गी. ५) तो माझ्याशी विनाकारण वैर कसे करील? वैर करतो असे जे वाटते ते या मनाच्या दुष्ट स्वभावामुळे बुद्धीला वाटते. बुद्धी माझ्या तंत्राने चालली पाहिजे. अर्थात् माझा कोणीही वैरी-शत्रू नाही. 'जे जे दिसे भूत। ते ते माझा भगवंत। सुखदाता कृपावंत। हितकर्ता माझा।।' ही भावना दृढ झाली की स्वतःच्या बुद्धीस कोणी शत्रू वाटणार नाही.

### (३) तिसरा मार्ग आत्मस्वरूपदर्शनाचा

आपण स्वतः ज्यास 'मी' म्हणतो तो आत्मा बुद्धीपासून सर्व दृश्यापर्यंतच्या सर्वांहून निराळा आहे. आपण आत्मा आहोत तसा जो वैरी वाटतो तोही आत्माच आहे. अग्नी अग्नीशी, पाणी पाण्याशी, वैर करू शकत नाही. म्हणून माझ्याशी वैर करणारा कोणी असणेच शक्य नाही.

मीच सर्वत्र सर्व रूपाने आहे. मी माझ्याशीच वैर कसे करू शकेन? असे चिंतन केल्याने शत्रुभावना आपोआप गळून पडेल. वरील एका किंवा सर्व मार्गांनी विचार करीत गेल्यास कोणीही सात्विक वृत्तीचा मनुष्य

अजातशत्रू बनू शकेल. त्यास वैरी मानणारे अनेक असले तरी माझा कोणी वैरी आहे असे त्यास वाटणार नाही. एक आंग्ल कवी म्हणतो -

'I envy nobody, no, not I, Nobody envies me.'

(४) याहूनही **एक सोपा मार्ग आहे** ज्यांची आपल्या सद्गुरूवर दृढ निष्ठा असेल त्यानी प्रत्येक स्त्री-पुरुषास सद्गुरूरूप पाहण्यास लावावे. (तशी भावना करावी) कोणी दुःख देत आहे असे वाटल्यास आपल्या गुरुदेवास म्हणावे की, 'प्रभो या रूपाने येऊन या शरीराला पीडा देण्याची का तुझी इच्छा आहे? तूच जर या शरीराला, मनाला दुःख देऊ लागलास- माझ्या कल्याणासाठीच देत असलास- तरी अशा स्थितीत मी तुझे स्मरण कसे करू? व तूच दिलेला हा मनुष्यदेह तुझ्या स्मरणात खंड पडल्याने फुकट जातो त्याचे मला वाईट वाटते! तू दुःख दे, पण ते शांतपणे, आनंदाने सहन करण्याची शक्ती तू नाही मला दिलीस तर माझे कसे होईल?' अशी भावना मनात करीत जावी व मग काय चमत्कार होतो तो पहावा. प्रत्यक्ष घडलेली व डोळ्यांनी पाहिलेली गोष्ट.

प्रभुमूर्ती बाबा गंगादास डहाणूजवळील महालक्ष्मीला गेले. ना अंथरूण ना पांघरूण. चैत्र महिना. पिंपळाच्या पाराच्या दगडी फरशीवर नुसते लंगोटी नेसलेले पडले. पडतात तोच खूप डास चावू लागले तेव्हा बाबा म्हणाले, 'रामजी ! आपही मच्छरोंके सैंकडो रूपमें आकर मुझको नींद नहीं आने देते हो ! तो फिर अपने निजरूपमें आकर क्यों नहीं सताते? इतने रूप क्यों धारण किये? सबेरे तेरा भजन कैसे बनेगा?' झाले. एका क्षणात एकही डास तेथे राहिला नाही ! पूर्वाश्रमात त्यांच्या बरोबरच तेथे होता हा देह ! दत्तमहाराजांच्या (अष्टे येथील) चरित्रात वाघाची गोष्ट अशीच आहे. आपल्या भावनेचे फळ आपणास मिळते. सर्वत्र ईश्वर भरला असल्याने समोरील विरोधक जीवाच्या हृदयात तोच असल्याने तेथेही हळूहळू बदल होतो. प्रारब्धाचे फळ पदरात टाकल्याशिवाय त्या दुसऱ्या हृदयस्थ जनार्दनास सुद्धा गत्यंतर नसते.

—×××=×××—

# विभाग २

## परदोष-चर्चा कशी टाळावी?

या विषयाचे विवरण करण्यापूर्वी परदोष-चर्चा का करू नये हा विचार प्रथम केला पाहिजे. हे पाप आहे हा विचार आपण बाजूस ठेवू.

(१) जीव प्रत्येक गोष्ट सुखासाठी करीत असतो. किंवा दुःख निवारण्यासाठी करीत असतो. याशिवाय तिसरा हेतू असूच शकत नाही. स्वतःच्या सुखासाठी व दुःख निवारण्यासाठी प्राणिमात्राचा प्रयत्न सतत सुरू

आहे.

दुसऱ्याचे दोष वर्णन करताना किंवा चिंतन करताना ते आपल्या ठिकाणी नाहीत असे दाखविणे किंवा मानणे व त्यायोगे सुखी होणे हा प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष हेतू असतो. ज्या गोष्टीचे चिंतन मनुष्य करतो तसा तो होतो. घाणेरडी वस्तू दुसऱ्याच्या अंगावर मारण्यासाठी हातात घेतली की, प्रथम स्वतःच्या हाताला थोडी तरी घाण लागतेच. दोष ही घाणेरडी वस्तू आहे. ती उच्चारण्यासाठी प्रथम मनाला आपल्या हाती घ्यावी लागते म्हणून त्या घाणीने ते घाणेरडे होते. मन (तो दोष) ती घाण वाणीच्या हातात देते, त्यामुळे वाणी घाणेरडी होते. मन व वाणी घाणेरडी झाली म्हणजे क्रिया घाणेरडी होऊ लागण्यास फार वेळ लागत नाही. म्हणून दुसऱ्याच्या दोषांच्या चिंतनाने स्वतःच्या मनावर त्या दोषांचे बीज चित्तात रुजते. 'यच्चित्तः तन्मय भवति।। (श्रुती). तोतऱ्यांची नक्कल करणारे स्वतः तोतरे बनतात, त्यांचा तोतरेपणा जन्मभर जात नाही. मूळ तोतरा सुधारतो !

(२) दुसऱ्याचे जे दोष दिसतात, कोणाकडून ऐकू येतात ते खरोखरच त्याचे ठिकाणी आहेतच याची खात्री कोण देऊ शकणार? बरे, दोष कोणाचे ठिकाणी नाहीत? शुद्ध सुख, दुःखरूपी दोषरहित असते. आम्हाला ते पाहिजे आहे. मग जोपर्यंत दोषांचा संसर्ग मनाला व वाणीला होत राहील तोपर्यंत शुद्ध सुख कसे मिळणार? परदोषचिंतन स्वतःच दुःखदायक आहे, म्हणून ते टाळले पाहिजे.

(३) परदोष वर्णन करताना जे सुख वाटते ते खरूज किंवा गजकर्ण किंवा इसब खाजविताना वाटणाऱ्या सुखासारखे आहे. फक्त आग होणे हा परिणाम ताबडतोब दिसत नाही एवढाच फरक. म्हणून परदोषचर्चा व परदोषचिंतन बंद केल्याशिवाय शुद्ध सुख मिळविण्याची आकांक्षा करणे व्यर्थ आहे. शुद्ध सुख पाहिजे असेल तर अकरणरूपी हे साधन केलेच पाहिजे. परदोषचर्चा व चिंतन बंद झाले पाहिजे हे ठरले. दुःख हे पापाचे फळ असते म्हणून परदोषवर्णन व चिंतन-निरीक्षण ही पापे आहेत, असे शास्त्र म्हणते.

**या दोन गोष्टी कशा टाळाव्या.**

(१) प्रथम असा विचार करावा की, दुसऱ्याचे दोष खरे असले तरी त्याचे वर्णन करून आपणास फायदा काय? 'आमचे दोष घालविण्यासाठी' असे याचे उत्तर कदाचित येईल. कोणाचा दोष सहज दिसल्यास तो आपले ठिकाणी आहे की नाही हे प्रथम पाहावे. असल्यास सोडण्याचा प्रयत्न करावा. वर्णन करण्याने आमचा दोष कसा जाईल? म्हणून वरीलसारखी विचारसरणी ही आत्मवंचना आहे. आम्ही दोष करतो की, नाही? केल्याशिवाय रहात नाही असेच म्हणावे लागेल. निर्दोष कोणीच मानवादी

नाहीत.

(२) दुसरा असा विचार करावा की, दुसऱ्याच्या दोषांचे वर्णन करण्याचा आम्हाला अधिकार काय? शिक्षा करण्याचे आमच्या हातात आहे का? नाही; मग व्यर्थ वाणी विटाळवून वेळ फुकट का घालवावा?

(३) जे दोष दिसतात, वाटतात, कळतात ते त्या व्यक्तीच्या ठिकाणी असतीलच याची खात्री काय? व ते दोष ती व्यक्ती हेतुपूर्वक करते की, सहज घडतात, का दुसंगतीने घडतात याचा पत्ता आम्हास कसा लागणार?

ही विचाराची भूमिका झाली. आता

**क्रियाशील भूमिका पाहू.**

१) ज्याच्या संगतीत आपण बसून बोलतो त्या सर्वांनी परदोष वर्णन टाळण्याचे ठरविले पाहिजे. (वर्णन व श्रवण सारखेच).

भाषणाच्या ओघात घडलेच तर ते जो करील त्याला काही तरी शिक्षा ठरवावी. १, २ वेळ चहा किंवा असेच काही बंद किंवा १, २ दिवस त्याच्या संगतीस बहिष्कार.

२) परदोष वर्णन करू नका अशा सूचना मोठ्या अक्षरात चारी भिंतीवर लावून ठेवाव्या.

३) परदोष वर्णन कोणी केल्यास दुसऱ्याने त्यास बजावून भाषण तेथेच बंद करून पाच मिनिटे "हरे राम हरे राम... कृष्ण कृष्ण हरे हरे" याचा सर्वांनी मोठ्याने उच्चार करावा.

४) ज्याचे दोष असतील तो संगतीतील, प्रेमातला असेल तर त्यास प्रेमाने प्रत्यक्ष, एका बाजूस घेऊन जरूर तर सूचना द्यावी. पण मागे वर्णन करू नये.

याप्रमाणे वैचारिक व क्रियात्मक उपायांचे दिग्दर्शन केले. परिस्थिती प्रमाणे कमी जास्त उपाय सुचतीलच. मुख्य प्रबळ इच्छा पाहिजे व चुकून हा महादोष घडला तर त्याबद्दल वाईट वाटले पाहिजे, म्हणजे वरील नियमांच्या काटेकोर पालनाने १, २ महिन्यातच पूर्णपणे सफलता होईल.

आता थोडी **पारमार्थिक** चर्चा करू.

(३) आम्ही जे अपराध, दोष वगैरे करतो त्यांची चर्चा ईश्वराने करावयाचे असे ठरविले तर आमची किती दैन्यवाणी स्थिती होईल? आमच्या दोषांची त्याने क्षमा करावी अशी आम्ही रोज प्रार्थना करतो. मग आम्ही इतरांच्या दोषांकडे निदान दुर्लक्ष करणे व क्षमा करणे हे आमचे कर्तव्य नाही काय? आम्ही इतरांच्या दोषांबद्दल क्षमा करीत नाही तोपर्यंत 'आमच्या दोषांबद्दल ईश्वराने आम्हास क्षमा करावी' असे म्हणण्याचा अधिकार आम्हास कसा पोचतो व ईश्वराने काय म्हणून क्षमा करावी? चांगले, वाईट

गुणी, दुर्गुणी सर्वच लोक ईश्वराची लेकरे आहेत. त्यातील एकाने आपल्या भावंडास क्षमा न करता आईजवळ म्हणावे की तू मला क्षमा कर, तर ते योग्य आहे का? व ईश्वर ते करील का?

१) आध्यात्मिक दृष्टीने दोष व गुण मायाजनित आहेत. दोन्हींची चर्चा न करणे उत्तमच. पण दुसऱ्यांच्या गुणांचीच फक्त चर्चा करणे हितावह आहे. 'गुणदोषदृशिर्दोषो गुणस्तुभय वर्जितम्' ''गुण हा, उभय (गुण दोष) न पहाणे, हा अविवेक'' (रामचरित मानस).

२) पंचभूतात्मक देह आहे तेथे काही दोष व काही गुण असावयाचेच. पंचभूते मायाजनित आहेत. मायेत दोष व गुण दोन्ही आहेत. कोठे कधी दोष जास्त तर कोठे याच्या उलट. कारल्याचे, कडुलिंबाचे सर्व कडू; पण फुलांचा वास किती गोड! अत्यंत वाईट वस्तूत एखादा चांगला गुण असतोच व अत्यंत चांगल्या वस्तूत एखादा वाईट दोष असतोच. निर्दोष असा एक परमात्माच आहे! 'न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः। सत्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिःस्यात्त्रिभिर्गुणैः'' म्हणून, नाथमहाराज म्हणतात की, :

तत्काळ पाववाया ब्रम्हपूर्ण। **सर्वाभूतीं भगवद्भजन।**
सांडोनियां दोष गुण। हें चि साधन मुख्यत्वें।। (ए.भा.)

या दोन गोष्टी जे दृढ प्रयत्नाने करतील ते याच देही शुद्ध सुखाच्या नित्य साम्राज्याचे अधिपती बनतील. परमार्थ साधकांना श्रीरामप्रभू या दोन गोष्टी साधण्यास मदत करो.

**विशेष** - दोषाबद्दल शिक्षा करण्याचा ज्यांचा अधिकार असेल त्यांनी त्या दोषी व्यक्तीस योग्य शिक्षा, त्या अधिकाराच्या भूमिकेवर असता करणे जरूर आहे.

हरि ॐ तत्सत

# ११. स्वाध्याय : श्रींची वाङ्मयसंपदा

## प्रकाशित ग्रंथ

१) **श्रीगुरुगीता प्रबोधिनी** - लेखन शके १८६५ (काव्यसंख्या २५५) स्कंद पुराणातील गुरुगीतेवरील प्राकृत पद्यमय टीका - प्रकाशन १९८० मध्ये 'संत-सेवा' हंस मंडळांतर्फे झाले.

२) **श्रीरामचरितमानस मराठी अनुवाद** - लेखनकाल शके १८६७ (सन १९४५) ३ महिने लागले. (काव्यसंख्या १० हजार), प्रकाशन १९४९ साली पुणे येथे श्री. लालचंद कटारे यांनी केले. यावेळी **श्री तुळशीदास-चरित्रही** प्रसिद्ध झाले.

३) **संगीत समश्लोकी गीता**- लेखनकाल १९४४ (काव्यसंख्या ७००) प्रकाशन १९४९ मध्ये पुणे येथे श्री. ना. भा. जोशी यांनी केले.

४) **वेदान्तसार अभंग रामायण** -लेखनकाल सन १९४८, काव्यसंख्या १७० अभंगगुच्छ, प्रकाशन १९५४ साली 'शक्ती ऑफसेट वर्क्स, वर्धा. नागपूर' यांनी केले.

५) **स्फुटकाव्य संग्रह आणि अभिनव रामायण**- प्रकाशन १९५३ मध्ये सातारा येथे श्री. ना. भा. जोशी यांनी केले.

६) **मानस गूढार्थ चंद्रिका-नमुना अंक**- श्रीरामचरित मानसावरील मराठी टीका (सती मोह प्रकरण) प्रकाशन १९५४ मध्येच श्री. ज. चिं. ओक यांनी प्रकाशन केले. (पृष्ठसंख्या ७६) (मराठी).

७) **मानस गूढार्थ चंद्रिका-प्रस्तावना खंड** - (मानसावरील मराठी टीकेची विस्तृत प्रस्तावना - पृष्ठसंख्या सुमारे ७००) प्रकाशन, मानस गूढार्थ चंद्रिका प्रकाशन मंडळ, इस्लामपूर यांनी १९५८ साली केले.

८) **श्रीरामचरितमानस (मराठी गुटिका)**- २री आवृत्ती (मराठी) प्रसाद प्रकाशन, पुणे यांनी १९६१ साली प्रसिद्ध केली. ३री आवृत्ति गुरुदेव रानडे मंदिर बेळगांव यांनी प्रकाशित केली.

९) **श्रीमानस गूढार्थ चंद्रिका** (हिंदी) खंड १ ला पृष्ठे २००

१०) **श्रीमानस-गूढार्थ चंद्रिका**- (हिंदी) खंड २ रा पृष्ठे २००, मार्च १९६२ ला मंत्री, मासनसंघ - पोष्ट : रामवन, सटणा, यांनी प्रकाशित केला,

११) **संध्योपासना ऊर्फ मानवतापूर्ति साधन, संध्योपासना**- पूर्वार्ध व उत्तरार्ध २७० पृष्ठे व ३० पृष्ठे (अंदाजे). प्रकाशन १९६३ ऑगस्ट. महाराष्ट्र ग्रंथ भांडार, कोल्हापूर. दुसरी आवृत्ति १९८९.

याशिवाय साधक बोध सिंधु, नित्यभजन संग्रह, या पुस्तिका आणि 'मानसमणि' या हिंदी मासिकांतून ४२ लेख प्रसिद्ध झाले.

## अप्रकाशित ग्रंथ

१) **परमामृत प्रकाश** - गद्य प्राकृत टीका, मुकुंदराजकृत 'परमामृता वरील (मुद्रणप्रत १९४८ साली केली आहे.)

२) **वेदस्तुति-प्रभाकर**- श्रीमद्‌ भागवतांतील दशम स्कंधातील 'वेदस्तुति' वर प्राकृत पद्यमय टीका लेखनकाल सन १९४६. लेखकाचे हृदगत ८५ ओव्या + ४४१

काव्यसंख्या.

३) **श्री वेदस्तुति कीर्तन भास्कर-** 'वेदस्तुति' वरील प्राकृत टीका, काव्यसंख्या १३४४ (लेखनकाल सन १९४७)

४) **श्री भगवत्गीता कीर्तन तरंगिणी** - गीतेतील १५ व्या अध्यायाच्या २० श्लोकांवर वीस तरंग अशी प्राकृत पद्यमय टीका (लेखनकाल १९४६-४७)

५) **श्री ब्रह्मस्तुति** - श्री भागवतांतील दशमस्कंधांतील ब्रह्मस्तुतिवरील प्राकृत टीका - चौपाई, दोहा इत्यादि वृत्तांत. मूळ ४० श्लोकांवर २८५ काव्य संख्येइतकी टीका- (लेखनकाल सन १९४९)

६) **गूढार्थ चंद्रिका-** (मराठी बृहत टीका) पृष्ठसंख्या ६५०० सुमारे. (लेखनकाल १९५३ ते १९५५.)

७) **मानस गूढार्थ चंद्रिका** - (हिंदी बृहत टीका) पृष्ठसंख्या ६५०० अंदाजे. (लेखनकाल १९५९ ते १९६१ साधारणपणे)

८) **श्रीराम रुद्र-शतनाम स्तोत्र-** (मराठी) लेखनकाल १९६२ अंदाजे.

९) **संस्कृत श्रीरामनाम स्तोत्र-** लेखनकाल १९६२ अंदाजे.

१०) **परमार्थ पत्रावली-** साधकांना लिहिलेली काव्यमय पत्रे व कितीतरी स्फुट काव्ये अद्याप अप्रकाशित आहेत.

श्री स्वामींच्या हस्ताक्षरातील दुर्मिळ मुद्रणप्रती परंडा येथे सुरक्षित ठेवल्या असून अभ्यासकांना अवलोकनार्थ उपलब्ध करून देण्याची व्यवस्था करण्यात आलेली आहे. अधिक माहितीसाठी संपर्क साधण्याचा पत्ता -

श्री. आदिनाथराव यादव, ॲडव्होकेट
श्रीहंस मंडळ, परंडा जि. उस्मानाबाद
अगर
'कैवल्य', शिवाजीनगर, बार्शी जि. सोलापूर

॥ श्री सद्गुरु प्रसन्न ॥

# आठवणी

## कै. श्री. ग. वि. जोशी, मुंबई

**ज़ो साधुचा अंकित जीव झाला**
**त्याचा असे भार निरंजनाला**

सन १९४३ चे सुमारास माझा श्री स्वामीशी परिचय झाला व त्याच वेळी त्यांची कृपाही आमचे कुटुंबावर झाली. आचारपालनावर स्वामींचा कटाक्ष होता आणि आमचे घरी तो पाळला जात असल्यामुळे ते मुंबईस आले म्हणजे आमच्या घरीं त्यांचा मुक्काम असे. स्वामींच्या प्रेमळ स्वभावामुळे माझी मुले व कुसूम, शांता, या मुलीही बालपणापासून स्वामींच्या आज्ञेचे पालन करीत असत.

१९५९-१९६० चे सुमारास माझा नातू चि. राम, व्हायरस न्युमोनियाने आजारी पडला. उपचार चालूच हाते. पण ताप कमी होईना. श्री स्वामींना त्याच्या तब्बेतिबद्दल कळवले तेव्हां त्यांनी हनुमान चालिसाचे पाठ करण्यास सांगितले. मुले, नाना, शांता, कुसूम रोज सांगितल्याप्रमाणे ४२ पाठ करीत. मुलाचा आजार गंभीर आहे. नीट काळजी घ्यायला पाहिजे, व वेळेवर औषध द्यायला पाहिजे असे डॉक्टरांनीही सांगितले होते व त्याप्रमाणे इलाज चालू होता. हनुमान चालिसाचे पाठ चालू असतांनाच ९ व्या दिवशीं रात्री ताप निघून घामाने कपडे व अंथरूण ओले झाले, व त्याचे अंगही थंडगार पडले. घरातील सर्व मंडळी घाबरली. त्याचे अंगास ब्रँडी वगैरे चोळून उष्णता आणण्याचे प्रयत्न चालू केले. कांही वेळाने रामने डोळे उघडले व तो शुद्धीवर आला. नंतर सांगू लागला "एक राक्षसासारखा माणूस मला सारखा ओढत होता आणि एक म्हातारा माणूस मला दुसरीकडून ओढू लागला. त्या म्हाताऱ्या माणसाने आपल्या हातातील गदा त्या राक्षसाच्या डोक्यात घातली व तो राक्षस नाहीसा झाला."

रामची तब्बेत थोडी सुधारल्यावर श्री स्वामींना हा अनुभव कळविला तेव्हा ते म्हणाले 'हनुमान चालिसाच्या पाठाने श्री हनुमंतानेच तुमच्या रामाला वाचविले.'



## सिद्धि आणि स्वामीजी

## श्री. मारुतीराव देशपांडे, सातारा

एकदां श्रीस्वामींशी चर्चा करीत असतां सिद्धिंचा विषय निघाला, तेव्हां बोलण्याच्या ओघात श्रीस्वामी म्हणाले की चास-कमानला मुक्काम असतांना नदीवर स्नानास जात असे. स्नानानंतर घाट चढून वर आलो की सर्वत्र सुगंध पसरत असे पण या सुवासाची कल्पना आम्हांस नव्हती. एके दिवशी कांही माणसे, 'काय संन्याशाचा रूबाब पहा, वासाचे साबण व अत्तरे यांना लागतात. यांच्या जवळून गेले तरी सुगंधाचा घमघमाट सुटतो.' असे म्हणतांना ऐकले. तेव्हां कल्पना आली व रामरायाची प्रार्थना करून या सिद्धीला दूर घालविले.

तपाने, ईश्वरभक्तीने सर्व सिद्धि प्राप्त होतात पण आत्मज्ञानाच्या मार्गातील ही विघ्नें आहेत हे जाणून त्यांचा उपयोग संत सत्पुरुष करीत नाहीत. पण ईश्वरी इच्छेने केव्हा केव्हां संतांचे हातून चमत्कार होतातही.

सत्पुरुषांची भेट होण्यास सुद्धा योग यावा लागतो. सातारा येथे श्री बाबूराव जोशी यांचेमुळे पुष्कळ जणांना श्री स्वामींच्या अनुग्रहाचा लाभ झाला. श्री. जोशी यांच्या प्रवचनामुळेंच यांचे सद्‌गुरु आहेत तरी कोण अशी उत्सुकता सहजच उत्पन्न झाली. पुढे श्री स्वामींजी हेच साताऱ्यास आले (१९५४) व त्यांची प्रवचने सुरु झाली. ती ऐकणे, मधून मधून निरनिराळ्या अध्यात्मिक विषयावर चर्चा करणे, मानस पारायण करणे, भजनात भाग घेणे, यामुळे स्वामींच्याशी अधिकाधिक परिचय होत गेला. त्यांचेकडून दीक्षा घेण्याची तर इच्छा होती पण त्यांनी कांही अटी घातल्या होत्या त्याची पूर्तता कांही होत नव्हती. त्यामुळे तो कार्यभाग २-३ वर्षे लांबला. व पुढे १९५७ साली इस्लामपूर येथे दीक्षा मिळाली.

दीक्षेच्यावेळी संचार होणे, किंवा इतर कांही बदल वाटला नाही, कांही दिवसांनी स्वामी म्हणाले की कुंडलीनी जागृत होण्याच्या दृष्टीने सर्व कांही झालेले आहे. व लौकरच ती जागृत होईल. परंतु कित्येक वर्षे गेली तरी तसा कांही अनुभव आला नाही.

श्री स्वामींचे आचरण फार कडक असे व त्याचे काटेकोरपणे पालन इतरांना अशक्यच होई. एकदां अंगात फार ताप असल्यामुळे ते पडून होते. सर्व अंग दुखत होते. रात्री कांही सेवा आपणांस करतां यावी म्हणून मी व श्री. बाबूराव जोशी असे दोघेजण सोवळे नेसून तयार झालो. पण अंथरूण घालणे वगैरे इतर कामा व्यतिरिक्त कांही त्यांनी करूं दिले नाही. शरीर स्पर्श करण्यास स्पष्टपणे त्यांनी नकार दिला. कोणतीही सेवा घेतली नाही.

सरस्वती त्यांचे जिव्हाग्री होती हे त्यांच्या वाङ्मयावरून दिसतेच पण बोलताना सुद्धां काव्य, व्युत्पत्ति व शब्दांचा उपयोग इत्यादि गोष्टी प्रत्ययास येत असत.



## कै. श्री. सौ. वत्सला मुगांवकर, परांडा

श्री स्वामी पहिल्यांदा जेव्हा परांड्यास आले, तेव्हां त्यांचा मुक्काम ज्या देशमुखांच्या वाड्यात होता, तो वाडा भुताने पछाडलेला होता. कित्येक वर्षात त्या घरांत कोणी सहातच नव्हते श्रींचा मुक्काम तेथे झाल्यावर त्यांनी तेथील मृतात्म्यांना एक विशिष्ट जागा नेमून दिली व बजावले की 'येथील कोणासही त्रास होतां कामा नये.' त्यावर 'आम्हाला गति द्या व त्यासाठी आमचेकडून कांही सेवा घ्या' असा आग्रह त्यांनी धरला. पण श्रींनी तिकडे लक्षच दिले नाही.

श्री स्वामींची कांही सेवा आपणांस घडावी म्हणून मी माझे सकाळचे कामधाम आटपून स्वामींची वस्त्रें धुण्यांस देशमुख वाड्यात जात असे. घरातील कामामुळे एके दिवशी मला नेहमीपेक्षां वाड्यात जाण्यास उशीरच झाला. मी आलेली पाहून स्वामी म्हणाले, 'अग आज पुन्हां कशीकाय आलीस? मघाशीच वस्त्रे धुवून गेलीस ना?' तेव्हां मी म्हणाले, की 'अत्ताच तर पहिल्यांदा आले - आज रोजच्यापेक्षां थोडा उशीर झाला खरा. पण हे काय! आज वस्त्रे कोणी येऊन धुतली?' तेव्हां स्वामी म्हणाले की येथील मंडळीनी येऊन सेवेची संधी साधलीसे दिसते. मग मला उलगडा झाला की वाड्यातील मृतात्म्यांनी बरोबर वेळ साधून माझ्या रूपाने येऊन स्वामींसेवेचा लाभ घेतला. हे पाहिल्यावर मी आश्चर्याने थक्कच झाले.



## सौ. शशी (जानकी) जोशी, बत्तीस शिराळा

१९४६ साली मी सुमारे १२ वर्षाची असताना, चासला आमच्या गावी पांडुरंगाचे मंदिरात श्री स्वामींचे प्रथम दर्शन झाल्याचे स्मरते. माझ्या वडिलांनी घरून श्रींचे साठी मला कॉफी आणून देण्यास सांगितले.

मी कॉफी आणून दिली व श्रीस्वामींना नमस्कार करून बसले. तेव्हां त्यांनी मला नांव विचारले - मी शशिकला असे नांव सांगताच मला म्हणाले, 'तुझ्या नावाचा अर्थ सांग पाहू!' मी म्हणाले, 'शशी म्हणजे चंद्र, व कला म्हणजे प्रभा' त्यावर म्हणाले 'वा छान! बरोबर! असे म्हणून हंसले व म्हणाले की 'छान चंद्रासारखी तेजस्वी हो बरं!

पुढे मी जेव्हां प्रथम साडी नेसू लागणार तेव्हां माझ्या भावाने एक नऊवारी पातळ माझ्यासाठी मोठ्या कौतुकाने आणले. पण तो त्याचा चॉकलेटी रंग म्हाताऱ्या

